# प्रीतिपुष्प

ना. सी. फडके

सौ. कमला फडके



प्रकाशन क्रमांक ६५

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, गिरगांव, मुंबअी ४.

मूल्य अडीच रुपये

प्रकाशक :
ग. पां. परचुरे,
ग. पां. परचुरे
प्रकाशन मन्दिर
गोरेगांवकर चाळ क्र. २
गिरगांव, मुंबअी ४.



मुखपृष्ठसजावट :
रघुवीर मुळगांवकर.

प्रथमावृत्ति
१९५१

## कथानुक्रम

---

### ना. सी. फडके :



### सौ. कमला फडके :



मुद्रक :
मा. कृ. सहस्रबुद्धे,
श्रीज्ञानेश्वर प्रेस, कोल्हापूर.

# १ : स्वप्न

पहाडाची चढण चढतां चढतां मियां लतीफनीं गाडी थांबविली. त्यांच्या डाव्या हाताशीं बसलेल्या बेगम रोशननं विचारलं, “ क्यूं ? ” तिच्या या प्रश्नात्मक उद्गारांत आश्चर्य होतं, पण खरं म्हणजे बराच वेळ ती आपल्या मनाशीं म्हणत राहिली होती, आपले पतिराज पुढें जाण्याचा हट्ट न करतां गाडी थांबवितील आणि परत फिरतील तर तें अधिक शहाणपणाचं ठरेल.

चहूं बाजूंला मोठमोठ्या देवदार वृक्षांचं जंगल. नजिकच्या पहाडाचे निळे काळे सुळके, पलीकडे सतत दिसणारे पर्वतांचे बर्फाच्छादित माथे, खालच्या खोल दरींतला वाकडीं तिकडीं वळणं घेत जाणारा, इतक्या उंचावरून छोटासा दिसणारा, व मधूनच तिसऱ्या प्रहरच्या उन्हांत चमकणारा जेहलमचा प्रवाह, शिटी घालीत घुमणाऱ्या जंगलवाऱ्याच्या झोतानं कधीं जोरानं तर कधीं मंदपणें हलणाऱ्या वृक्षशाखा, नाना तऱ्हांच्या जंगल-पक्षांची मधूनच होणारी फडफड—कश्मीर दरीच्या अपूर्व भव्य वैभवाचं हें सारं दृश्य रोशन गेल्या दोन घटकाभर सारखं पहात राहिली होती. परंतु त्या सौंदर्याची मजा पूर्णपणें घेण्याइतकं तिचं मन स्वस्थ नव्हतं.

कश्मीरच्या उत्तर सीमेपलीकडे जो अत्यंत रमणीय असा जंगली प्रदेश आहे त्यांतल्या एका छोट्या गांवीं आठ दहा दिवस निवांतपणें घालविण्याचा बेत नवराबायकोनीं केला होता. त्या गांवीं एक लहानसा डाकबंगला फारच रम्य स्थळीं आहे असं अनेक मित्रांकडून लतीफनीं ऐकलं होतं व ते आपल्या बेगमला वारंवार म्हणाले होते, “ केव्हां तरी एकदां या बंगल्यांत आपण राहूं या. ” आणि रोशन दर वेळीं म्हणाली होती, “ हां, जरूर. ” परंतु अनेक वेळां त्या दोघांनीं मनाशीं केलेला हा विचार आजपर्यंत या ना त्या कारणानं नुसता मनांतच राहिला होता. पण लतीफनीं जेव्हां भारी किंमतीची छोटी गाडी विकत घेतली तेव्हां नवराबायकोनीं ठरविलं, कीं या गाडींत पहिली खूप लांबची सफर करायची तर सीमेवरील पहाडापलीकडच्या

जंगलांतल्या त्या डाक बंगल्याची. आणि अखेर एके दिवशीं सारी तयारी करून त्यांनीं शहर सोडलं होतं.

दुपारचा खाना त्यांनीं वाटेंतच एका सुंदर स्थळीं जंगलांतल्या एका ओढ्याच्या कांठीं बसून केला होता. आणि नंतर थोडीशी वामकुक्षी करून गाडी पुन्हा सुरू केली होती. पर्वतांची रांग ओलांडून त्यापलीकडची दरी लवकरच गांठणं जरुरीचं होतं. कारण रात्र पडण्याच्या आधीं डाक बंगल्यांत पोचणं इष्ट होतं. लतीफ शक्य तितक्या वेगानं गाडी हांकीत होते. रोशन फारशी बोलत नव्हती. परंतु खुषींत होती. सभोंवतालचं रमणीय दृश्य पुनःपुन्हा नवऱ्याला दाखवून ती म्हणत होती, "देखो!"

मोठ्या रस्त्यानं वेगानं जातां जातां मियां लतीफना जेव्हां डाव्या अंगाला एक रस्ता फुटलेला दिसला तेव्हां गाडी थांबवून त्यांनीं रोशनला विचारलं, "या वाटेनं काढूं काय गाडी?"

त्यांची ती कल्पना रोशनला चटकन् पटली नाहीं. पहाडांतल्या या रस्त्याच्या हजार नागमोडी वळणांमुळें आणि अरुंदपणामुळें त्या मुख्य रस्त्याबद्दलच तिच्या मनांत साशंकता निर्माण झाली होती. तिला वाटे, जिकडे आपल्याला जायचं आहे तिकडे हा रस्ता आपल्याला खरोखरच नेईल कीं नाहीं कोण जाणे. कधीं चढत जाणारा, कधीं एकदम उतरत जाणारा, आतां पुढें पहाडाच्या भिंतीपलीकडे हा रस्ता मुळीं जाणारच नाहीं असा भास उत्पन्न करणारा तो अरुंद रस्ता तिला फार चमत्कारिक वाटूं लागला होता. "रस्त्याबद्दल तुमची खात्री आहे ना?" असं लतीफना विचारण्याचं तिच्या दहादां मनांत आलं होतं...आणि आणखीच अरुंद अशा त्या रस्त्याकडे बोट दाखवून ते म्हणत होते, 'या रस्त्यानं गाडी काढूं काय?' ती म्हणाली,

"मुख्य हमरस्ता सोडावा असं मला नाहीं वाटत."

"पण या हमरस्त्यानं आपण गेलों तर फार उशीर होणार." एकीकडे मनगटावरचं घड्याळ पहात लतीफ म्हणाले, "हा डाव्या हातानं जाणारा रस्ता जवळचा रस्ता असावा असं मला वाटतं." पहाडाकडे बोट उंच करून दाखवून ते पुढें म्हणाले, "त्या ठिकाणीं हे दोन्ही रस्ते पोंचत असले

पाहिजेत. या डाव्या रस्त्यानं आपण गेलों तर पुष्कळसा वेळ खचित वाचेल. जाऊं या काय ? बोल."

रोशनला अनुभवानं माहीत झालं होतं कीं ते जरी तिची मसलत घेण्याचा देखावा करीत होते तरी त्यांच्या मनाचा निर्णय आधींच झाला होता. अशा वेळीं त्यांच्याशीं वाद घालण्यांत कांहीं अर्थ नव्हता. त्यांचं म्हणणं आपल्याला मान्य आहे अगर अमान्य आहे असं कांहींच न दर्शवितां तिनं फक्त "हूं" असा उद्‌गार काढला होता. आणि तिचा तो रुकार होता किंवा नाहीं हें ठरवीत न बसतां मियां लतीफनीं गिअर बदललं होतं आणि डाव्या बाजूच्या रस्त्यानं गाडी हाकली होती.

दोन्ही बाजूंचं जंगल भरारा मागें पडत होतं. पक्षांचे आवाज मधूनच ऐकूं येत होते. गाडीच्या आवाजानं भ्यालेल्या जनावरानं दूर कुठें तरी केलेल्या हालचालीमुळें झाडांच्या फांद्या मोडून झालेला आवाज ऐकूं येत होता, बराच वेळ जंगलाच्या दाटपणामुळें ऊन्ह अजीबात दिसेनासं होत असे, पण मधूनच कुठल्या तरी फटींतून त्याची तळपणारी तिरीप अंगावर पडून जात असे. परंतु हें सारं सौंदर्य पाहतां पाहतां रोशन मनाशीं विचार करीत होती, आपल्या नवऱ्यानं या वाटेनं गाडी चालविली आहे खरी, परंतु ही वाट दगा देणार असं दिसतं. 'आपण ठीक रस्त्यानं जात आहोंत ना ? भलत्याच रस्त्यानं जात असलों म्हणजे पंचाईत–' अशी कांहीं तरी तक्रार करावी असं तिच्या मनांत कितीदां तरी आलं; परंतु ती कांहीं बोलली नाहीं. आधींच गाडी हाकण्याच्या श्रमांनीं त्रासलेला आपला नवरा आपल्या बोलण्यानं कदाचित् चिडेल असं तिला वाटत होतं. आज दहा वर्षें तिनं त्याच्याशीं संसार केला होता तो अशा प्रकारें त्याच्या वेळोवेळींच्या लहरी ओळखून आणि मर्जी संभाळूनच. ती कॉलेजांत असतांना आणि लतीफ बॅरिस्टर म्हणून नुकताच वकिली करूं लागलेला असतांना तीं दोघं जेव्हां प्रथम एकमेकांच्या प्रेमांत पडलीं होतीं तेव्हां प्रियाराधनाच्या काळांत, आणि विवाहित आयुष्याच्या प्रारंभींच्या दिवसांत त्या दोघांत हंसण्याखेळण्याबरोबरच रुसणींफुगणींहि वरचेवर होत असत, आणि तीं सहज खपून जात असत. परंतु संसाराचा पहिलेपणा संपला आणि विवाहित आयुष्यांत ठरीव सांचा येऊं लागला कीं नवराबायकोंतलीं भांडणं बहुधा संपतात,

आणि त्याबरोबरच मनमोकळेपणाहि बंद होतो. रोशनचं तसंच झालं होतं. प्रियाराधनाच्या दिवसांत गाडींतून जातांना असा प्रसंग आला असता तर तिनं आपला मतभेद स्वच्छ सांगितला असता आणि त्यानं गाडी परत वळवावी म्हणून हट्ट देखील धरला असता...पण ते दिवस आतां फार मागं पडले होते. लतीफ आणि रोशन दोघंहि सुविद्य, सुशिक्षित आणि आधुनिक मताचीं होतीं. त्यांनीं प्रेमाखातर लग्न केलेलं होतं. परंतु अशा जोडप्यांचे देखील संसार आठ दहा वर्षांचे जुने झाले कीं त्याचे कांहीं ठरलेले परिणाम पत्करावे लागतातच...ज्या रस्त्यानं लतीफनीं गाडी चालविली त्या रस्त्याबद्दल आतां रोशननं शंका घेतली असती तर त्यांना तें आवडलं नसतं. प्रेमाच्या पहिल्या दिवसांत मनुष्य अहंकार जरासा विसरतो; पण कालांतरानं प्रेमाला जुनेपणा आला कीं ज्या त्या गोष्टींत त्याला तो आठवूं लागतो. रस्त्याबद्दलची शंका म्हणजे आपल्या शहाणपणाबद्दलची शंका असा लतीफनीं अर्थ केला असता...म्हणून या रस्त्याचं लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं असं जरी रोशनच्या मनांत सारखं येत होतं तरी ती निमूटपणें बसली होती...तिनं मनाशीं ठरविलं होतं, काय व्हायचं असेल तें होऊं दे. आपण कशाला मधें बोला?...

त्यामुळें लतीफनीं जेव्हां गाडी एकदम थांबवून उभी केली तेव्हां तिच्या तोंडून आश्चर्याचा उद्गार निघाला, "क्यूं?"

ते म्हणाले, "इंजिन तापलं असेल. तें थंड व्हावं म्हणून गाडी थोडी थांबवूं या."

"पण आपला रस्ता चुकला नाहीं याची खात्री आहे?"

"रस्ता काय चुकतो?" त्यांनीं उंच बोट करून दाखविलं आणि म्हटलं, "ती पाहिलीस? तिथें खिंड असली पाहिजे. आणि ती ओलांडली कीं दरी लागणार—"

"खिंड कशावरून? एखादं वळण असेल—"

"पाहूनच येतों. म्हणजे शंका नको. माझे पायहि जरा मोकळे होतील." असं म्हणून ते उतरले आणि झपाझप पांचपन्नास पावलं टाकीत गेले. तिथें उभं राहून खिंडीच्या जागेकडे त्यांनीं नजर टाकली आणि ते परत आले. त्यांची चर्या रोशनला चमत्कारिक दिसली. तिनं विचारलं,

" खिंडच दिसते आहे काय ? "

तिच्या प्रश्नाला उत्तर देण्याऐवजीं ते म्हणाले, " हा काय विलक्षण चमत्कार ? "

" काय झालं ? "

" मी त्या ठिकाणीं जाऊन उभा राहिलों ना ? त्या क्षणीं एक विलक्षण चमत्कारिक विचार माझ्या मनांत आला—"

" कोणता ? "

" माझा मलाच तो इतका मूर्खपणाचा वाटतो—"

" पण काय ? सांगा कीं ! "

" ती खिंड असली पाहिजे असं मीं म्हटल्याचं तुला आठवतं ? "

" हं. "

" आणि खालीं दरी लागणार असं मीं म्हटलं, नव्हे काय ? "

" होय, आणखी मीं विचारलं—"

तिला पुढें बोलूं न देतां ते म्हणाले, " तिथें खिंड आहे आणि तिच्यापलीकडे दरी आहे, अगदीं हिरवीगार दरी आहे, हें एखाद्या माहितगार माणसाप्रमाणें मीं तुला कसं सांगितलं ? तुला आश्चर्य वाटलं असेल नाहीं ? पण तुला आणखी सांगतों, त्या दरींतल्या प्रत्येक झाडाचं आणि दगडाधोंड्यांचं बिनचूक वर्णन या क्षणाला मी करूं शकेन. मी तर या भागांत पूर्वीं कधीं आलों नाहीं तुला माहीत आहे. मग हें वर्णन मी करूं शकतों हा काय चमत्कार आहे ? "

किंचित् गंभीर चर्या करून पण हंसत रोशन म्हणाली, " चमत्कार तर खराच. पूर्वीच्या एखाद्या जन्मांत तुम्ही या भागांत राहिलां असाल. मेंढ्या पाळणारा गुराखी म्हणून तुम्ही राहिलां असाल किंवा—" जास्तच हंसून ती म्हणाली, " एखाद्या गुराख्याच्या कळपांतली मेंढी देखील असाल ! "

" थट्टेचा विषय नाहीं हा रोशन. " ते म्हणाले, " ती खिंड आणि तिच्यापलीकडच्या दरींतला सारा प्रदेश मीं स्वप्नांत पाहिला आहे. आपण इकडे येण्याचा बेत ठरविला त्याच्यापूर्वीं बरेच दिवस एकदां पहाटे मला हें स्वप्न पडलं होतं. "

" होय ? मोठा चमत्कार म्हणायचा !" रोशन पुटपुटली. मनाशीं थोडा विचार केल्याप्रमाणें थांबून ती पुढें म्हणाली, " मीं ऐकलंय कीं अशीं स्वप्नं माणसाला पडतात. अशा स्वप्नांचा खरेपणा अगर खोटेपणा कधीं पडताळून पाहतां येत नाहीं एवढीच वाईट गोष्ट असते."

" पण मला असं स्वप्न पडावं ? कां पडावं ? "

" कां तें सांगतां येणार नाहीं." रोशन म्हणाली. " पण असल्या स्वप्नांत कितपत अर्थ असतो हें पाहण्याची ही नामी संधि आहे. तुम्हीं स्वप्नांत जें पाहिलं तें सगळं मला सांगा. मग आपण पुढें जाऊं आणि पाहूं तुम्ही स्वप्नांत जशी पाहिलीत तशी खिंड आणि पलीकडची दरी आहे कीं नाहीं. कदाचित् नसेल. पण कदाचित् असेलहि. आणि जर असेल तर स्वप्नमीमांसा करूं पाहणाऱ्या पंडितांना मुद्दाम कळविण्यासारखं तुमचं हें स्वप्न ठरेल. सांगा मला."

लतीफनीं डोळे मिटून सांगायला आरंभ केला. " माझ्या स्वप्नांत याच रस्त्यानं मी चालत गेलों. त्या खिंडीपाशीं पोहोंचलों. तिथें एक मोठी शिला होती आणि त्या शिलेंत एक झाड उगवलेलं होतं. त्या शिलेपाशीं उभं राहून मीं खालीं नजर टाकली तों खालीं हिरवीगार सुंदर दरी मला दिसली."

एखादी गोष्ट ऐकतांना लहान मूल करतं त्याप्रमाणें " हूं " असं करून रोशननं विचारलं, " ती दरी कोणत्या आकाराची होती ? "

" साधारणपणें त्रिकोणाकृति होती. तिच्यापलीकडच्या टोकाला अजस्र पर्वत होता. त्याचा माथा बर्फानं झाकलेला होता—"

" हूं—"

" मी रस्त्यानं खालीं उतरलों आणि त्या दरींत प्रवेश केला. कांहीं वेळानं मला देवदार, चिनार, सफेदा अशीं झाडं दिसलीं. आणि त्यांतून वळणं घेत खळखळत जाणारा एक ओढा दिसला—"

" किती मोठा ? "

" सुमारें वीस पंचवीस कदम रुंद असावा तो. त्याच्या पात्रांत मधून मधून पांढरे शुभ्र दगड होते. मी तसाच पुढें गेलों तेव्हां मला

एक लहानसं घर दिसलं. या घराची गंमत अशी, कीं एका मोठ्या चिनार झाडाच्या भोवतीं बांधल्याप्रमाणें तें दिसत होतं— ”

“ हं. ”

“ घराच्या अंगणाला एक फाटक होतं. फाटकाजवळ एका उभ्या खांबाला ठोकलेली एक मोठी पाटी होती. त्या पाटीवर एक त्रिकोण होता आणि कांहीं अक्षरं लिहिलेलीं होतीं. तीं आतां मला आठवत नाहींत. ”

“ आणखी काय ? ”

“ आणखी किती तरी वर्णन मी करूं शकेन. ”

“ तुमच्या स्वप्नांतली ही दरी खरोखरच तिथें आहे कीं नाहीं तें पाहण्याची मला आतां घाई झाली आहे. गाडी सुरू करा. वेळ नको. ”

तिला आतां गेल्या दोन घटकांतल्या स्वतःच्या अस्वस्थपणाचा पूर्णपणें विसर पडल्यासारखा दिसला.

मियां लतीफ कांहीं एक न बोलतां गाडी हांकीत होते.

थोड्याच वेळांत चढाच्या माथ्यावर गाडी पोंचली. आणि काय आश्चर्य ! तेथें खरोखरच एक मोठी शिला होती. तिच्यांत एक झाडहि उगवलेलं होतं. मियां लतीफनीं गाडी उभी केली आणि दोघं नवराबायको खालीं दिसणाऱ्या देखाव्याकडे पहात अगदीं स्तब्ध झालीं.

अखेर रोशन म्हणाली, “ भयंकर आश्चर्य आहे. खरं वाटत नाहीं. पण खरं तर आहे. तुमच्या वर्णनाबरहुकुम ही दरी आहे. पुढें जाऊं या आणि तो ओढा, तें घर, या साऱ्या गोष्टीहि खरोखर आहेत कीं काय तें बघूं या.”

मियां लतीफनीं गाडी उताराला घातली आणि कांहीं वेळानं म्हटलं,

“ रोशन, माझ्या स्वप्नांतली एक गोष्ट तुला सांगायची राहिली. त्या स्वप्नांत एक बाई दिसली होती मला. ”

“ हां, आतां स्वप्नाला अधिक गंमत आली खरी. ” रोशन हंसून म्हणाली. “ त्या घरांत रहात होती काय ? घराची मालकीण होती ! किसानची बायको ? ”

“ अं हं. किसान बायांसारखी नव्हती ती. ”

“ सुंदर होती ? ”

" हां, मला सुंदर वाटली. तिचे केस लांब सडक आणि दाट होते. आणि डोळे निळे आणि टपोरे होते. "

आतां उतार संपून त्यांची गाडी सपाट रस्त्याला लागली होती.

रोशननं विचारलं, " किती वयाची होती ती ? "

" असेल पंचवीस सव्वीस वर्षांची. "

" लग्न झालेली ? "

" खरं म्हणजे तिचं माझं बोलणं असं फारसं झालंच नाहीं. मी आणि ती आम्ही दोघंही कशाला तरी भिऊन त्या घरांत लपलों छपलों होतों असं त्या वेळीं मला वाटलं—"

इतकं बोलणं होत आहे तों रस्त्याच्या कडेची ती छोटीशी वाडी आणि तें घरच त्यांना दिसलं. लतीफनीं केलेल्या वर्णनाबरहुकूम तें होतं. एका मोठ्या चिनारभोंवतीं बांधल्यासारखं तें दिसत होतं. फाटकापाशीं उभ्या खांबाला ठोकलेली एक पाटी होती तिच्यावर त्रिकोण होता, अक्षरं होतीं, सारं कांहीं होतं.

लतीफनीं गाडी उभी केली होती. त्या वाडीकडे पाहतां पाहतां रोशन म्हणाली, " इथेंच रहावंसं मला वाटतं. डाक बंगल्यांतली जागा आपण राखून ठेवली नसती तर—"

" खूळ लागलंय काय तुला ? " असं म्हणून लतीफनीं गाडी पुन्हा सुरू केली.

गाडी सुमारें अर्धा पाऊण मैल खूप जोरांत गेली. पण नंतर ती धसक् धसक् करूं लागली आणि अखेर अजीबात बंद पडली. मियां लतीफ रागाचा उद्गार काढून खालीं उतरले. त्यांनीं इंजिनवरचं ढापण उघडलं आणि हरप्रकारची खटपट करून पाहिली. परंतु गाडी बिलकुल हालेना. अखेर मियां लतीफनीं एक शिवी हांसडली आणि चिंध्यांनीं हात पुशीत रोशनजवळ येऊन ते म्हणाले, " आतां आली का पंचाईत ? त्या वाडीवर जाऊन कोणाची तरी मदत घेतली पाहिजे. "

रोशन हंसली व म्हणाली, " तुमच्या स्वप्नसुंदरीची आणि तुमची पुन्हां गांठ पडावी अशी दैवाची इच्छा दिसते. "

ती खालीं उतरली, आणि मियां लतीफ आणि ती मिळून वाडीपर्यंत चालत गेलीं. वाडीवरचे दोन तीन किसान त्यांनीं घेतले आणि त्यांच्या मदतीनं गाडी ढकलीत आणून वाडीच्या आवारांत उभी केली. दुसऱ्या दिवशीं अगर त्यानंतर केव्हां तरी उडीकडे जाणारी मेल मोटार या रस्त्यानं जाईल तेव्हां तिच्या ड्रायव्हरकडून गाडी दुरुस्त करून घ्यावी असं ठरविण्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता.

वाडीचा मालक गांवीं गेला होता. परंतु त्याची म्हातारी बायको घरांत होती. ती रोशनला आणि लतीफना म्हणाली, " तुम्ही कांहीं काळजी करूं नका. चाहेल तितके दिवस तुम्ही इथें राहा. " तिनं त्यांच्यासाठीं समूवार भरून नमकिन चहा तयार केला आणि चहासाठीं बसकट पेले व रोटी आणि उकडलेलीं अंडीं यांनीं भरलेली एक थाळी त्यांच्यापुढें ठेवून ती म्हणाली, " दमलां असाल. घ्या. "

फराळ करतां करतां रोशन हर्षभरानं लतीफना म्हणत होती, " कितीहो तुम्हीं स्वप्नांत पाहिलंत त्याप्रमाणें हुबेहुब हें घर आहे ! मधोमध हा चिनारचा बुंधा, त्याच्याभोंवतीं बांधलेल्या पांख्यासारख्या या सुबक खोल्या–" तिनं कांहीं वेळ इकडे तिकडे नजर टाकली आणि म्हटलं, " आतां फक्त एकाच गोष्टीचा पडताळा पहायचं शिल्लक राहिलं. "

ती हंसली. आपल्या नवऱ्याचा चेहरा एकाएकीं विलक्षण गंभीर झालेला पाहून तिला आश्चर्य वाटलं. तुम्ही एकदम इतके गंभीर कां झालांत असं ती त्याला विचारणार होती, पण तितक्यांत समोरच्या दालनांतून झप-झप पावलं टाकीत एक तरुण स्त्री पुढच्या दालनांत आलेली तिला दिसली.

अस्सल पंजाबी थाटाचा तिचा पोषाख होता. मियां लतीफ आणि रोशन ज्याप्रमाणें या घरांत पाहुणे म्हणून उतरले होते त्याप्रमाणें तीहि एक मेहमान मुशाफिर असली पाहिजे असं रोशनच्या मनांत आलं...

तिचे केस लांब सडक आणि दाट होते. तिचे डोळे निळे आणि टपोरे होते.

ती पुढच्या खोलींत क्षणमात्र उभी राहिली. वाडीच्या मालकिणीला ती म्हणाली, " घटकाभर हिंडून येतें. " हंसतां हंसतां अगदीं सहजगत्या जणु

ही नवी मंडळी कोण आहेत अशा अभिप्रायानं तिनं लतीफ व रोशन या दोघांकडे नजर टाकली, आणि मग ती तेथून झटकन् दूर होऊन बाहेर गेली.

रोशननं लतीफकडे पाहिलं तों ते थक्क झालेल्या माणसाप्रमाणें त्या पंजाबी पोषाखांतल्या तरुण स्त्रीच्या पाठमोऱ्या आकृतीकडे डोळे वटारून पहात होते...वाडीच्या मालकिणीला त्यांनीं विचारलं,

" या बाई इथें राहतात ? "

" छे " म्हातारी म्हणाली, " ती एक चंगीभंगी मुशाफिर आहे. दरवर्षी उन्हाळ्यांत ती इथें येऊन पांच दहा दिवस राहते. सिनेमांत आहे म्हणे कुठल्या–"

ज्या किसानांनीं गाडी ढकलून आणली होती त्यांनीं गाडींतलें सामान काढून आणून एका खोलींत ठेवल्याची वर्दी दिली, तेव्हां फराळ आटोपून लतीफ व रोशन उठून त्या खोलींत गेलीं.

" जरा बाहेर पडून हिंडून येऊं. चल. " लतीफ रोशनला म्हणाले.

" मला फार दमल्यासारखं झालं आहे दिवसभरच्या प्रवासानं. " ती म्हणाली. " मी पडतें जरा, तुम्ही एकटेच जाऊन या. "

" एकटं काय जायचं ? "

" असं काय करतां ? जाऊन या. " रोशन म्हणाली, " तुमच्या त्या स्वप्नांतल्याप्रमाणें ओढ्यांत पांढरे दगड आहेत काय पाहून या अन् मला सांगा. बाकी आतां संशय घ्यायची सोयच उरलेली नाहीं. "

मियां लतीफ एकटेच बाहेर पडले.

ओढा जवळच होता. तेथें पोंहोचल्यावर ते ओढ्याच्या पाण्यांत उभे राहिले. रोशन घराच्या दारांत येऊन उभी राहिली होती. तिनं ओरडून विचारलं,

" पांढरे दगड आहेत ओढ्यांत ? "

" हां ! " लतीफनीं उंच आवाजांत उत्तर दिलं.

" अन् पाणी गार आहे कीं गरम ? "

" जरासं गरम. "

रोशन हंसली आणि दारांतून दूर होऊन आंत गेली.

ती पुन्हां दारांत येते कीं काय याचा अदमास घेत राहिल्याप्रमाणें लतीफ बराच वेळ घराकडे पाहात जागच्या जागीं उभे राहिले. पण मग पाण्यांतून बाहेर येऊन त्यांनीं पायांत चढाव घातले व मग ओढयाच्या कांठाकांठानं कांहीं कदम झपाझप जाऊन ते गर्द झाडींत शिरले. तो प्रदेश त्यांच्या पूर्ण परिचयाचा असल्याप्रमाणें ते पुढें पुढें चालले होते. एका ठिकाणीं पाऊलवाट थोडी पुसट झाली होती, तेथें ते क्षणभर थबकले. पण आजूबाजूच्या खुणांची खात्री करून घेण्यापुरतं त्यांनीं इकडे तिकडे पाहिलं, आणि ते पुढें निघाले. त्यांचीं पावलं अगदीं घाईनं पडत होतीं. एक लहानशी टेकडी ओलांडून ते एका निमुळत्या घळींत शिरले, त्या घळीच्या टोकाशीं उंच हिरव्या गार गवतानं आच्छादिलेला लहानसा जमिनीचा मोकळा पट्टा होता. त्याच्याहि पलीकडे मुद्दाम लावल्याप्रमाणें वर्तुलाकार रांगेत उभीं राहिलेलीं सफेदाचीं कोंवळीं उंच सरळ झाडं होतीं, व त्यांच्या मधोमध रानवेलींचा एक प्रशस्त मंडप आपोआप तयार झाला होता.

तो दृष्टीस पडतांच मियां लतीफ स्वतःशीं हंसले, आणि धांवतच पुढें गेले.

ते मंडपाजवळ पोंचले तोंच आंतून एक स्त्री बाहेर आली. तिचे केस लांब सडक व दाट होते. डोळे निळे आणि टपोरे होते.

लतीफना पाहतांच ती क्षणभर जागच्या जागीं उभी राहिली. पण मग लगेच जखम झाली कीं माणूस काढतं तसा " ऊं ! " असा विवश उद्गार काढून तिनं हात पसरले व अंग पुढें झुकविलं.

मियां लतीफनीं तिला आपल्या बाहुपाशांत अगदीं घट्ट धरलं.

किती तरी वेळ तीं दोघंहि एकमेकांच्या मिठींत अगदीं निःशब्द होऊन उभीं राहिलीं. जणूं या रमणीय वनश्रीच्या क्रीडास्थानांत कुणा शिल्पकारानं प्रेमिकांच्या मीलनाचं चित्र म्हणून बनविलेल्या दोन शिल्पाकृतीच आलिंगनाच्या पवित्र्यांत उभ्या राहिल्या होत्या !

पहिल्या मिठीच्या गोडीची नशा जेव्हां थोडी कमी झाली तेव्हां तिनं हलकेच डोळे उघडले, त्याच्या ओठावरून आपले ओठ हळूंच फिरविले, आणि विचारलं, " तुझ्या बेगमला कांहीं शंका आलेली नाहीं ? "

( कल्पना इंग्रजीवरून )

छोट्या टेबलावरच्या वर्तमानपत्रांकडे त्यांची नजर वळली. तीं उचलून घेऊन वाचण्याची त्यांची इच्छा नव्हती. सर्वांत वरच्या वर्तमानपत्रावर " किसान " असं नांव होतं. जाड ठशांतल्या त्या तीन अक्षरांवरून त्यांचे डोळे फिरले, पण त्यांच्या मनांत विचार निराळेच चालू होते. खिडकीकडे जावं म्हणून ते कोचावरून उठणारच होते, पण तितक्यांत ' किसान 'च्या पहिल्याच पानावरचा सात कॉलमी आडवा मथळा त्यांच्या नजरेस पडला. " पंतप्रधान आणि एक बुड्ढा किसान ! " त्यांनीं वर्तमानपत्र उचलून घेतलं आणि ते वाचूं लागले:

" कानपूर जिल्ह्यांतील एका गांवचा ऐंशी वर्षांचा म्हातारा शेतकरी गंगाराम चार दिवस आपल्या जांवयाकडे राहण्यासाठीं दिल्लीस गेला होता. तो फार निराश होऊन परत आला आहे. आपल्या देशाच्या राजधानींत आपण आलों तर पंतप्रधानांची भेट घेऊन त्यांना अभिवादन करावं अशी त्याची इच्छा होती. त्याचं त्यांच्याशीं काम काय असणार ? पण त्याची येवढीच इच्छा कीं आपण आपल्या खेड्यावर परत गेलों कीं " अरे भाई, मी पंतप्रधानांची भेट घेऊन आलों बघा ! " असं गांवकऱ्यांना मोठ्या अभिमानानं सांगतां यावं. पण त्यानं खटपटीची शिकस्त केली तरी त्याचा हेतु कांहीं साध्य झाला नाहीं. दफ्तरांतला जो तो हपीसर त्याला विचारी, पंतप्रधानांशीं तुझं काम काय आहे ? तो म्हणे माझं काम कांहीं नाहीं. मला फक्त त्यांना भेटायचं आहे. त्याला उत्तर मिळे, कामावांचून पंतप्रधान कुणाला भेटत नाहींत. अखेर बिचाऱ्यानं तो नाद सोडून दिला. अतिशय निराश होऊन तो परत आला आहे. तो म्हणतो, पंतप्रधानांची भेट इतकी मुष्किल असावी हें ठीक नाहीं. आमचं राज्य आहे, पंतप्रधान आमचे आहेत, तर माझ्या-सारख्या सामान्य माणसाला देखील त्यांची गांठभेट घेतां आली पाहिजे. मला काय त्यांच्याशीं कांहीं मागायचं होतं थोडंच ! त्यांना प्रत्यक्ष पाहायचं,

मुजरा करायचा, ठीक आहे ना विचारायचं, परत यायचं, एवढीच माझी इच्छा होती. कुणालाहि अशी इच्छा असेल. पण माझी, कुणी दादच घेईना! मला हात हालवीत परत यावं लागलं. हे पंतप्रधान आमचे आहेत असं नाहीं आतां मला वाटत... "

त्यांनीं तो "किसान"चा अंक दूर ठेवला. ते स्वतःशींच हंसले. दिल्लीला जाणाऱ्या प्रत्येक माणसाची गांठ घ्यायचं पंतप्रधानांनीं ठरविलं तर त्यांची काय दशा होईल?...पण लगेच त्यांच्या मनांत असंहि आलं, कीं एखाद्या माणसाला पंतप्रधानांची भेट घ्यावी असं वाटलं तर त्याची इच्छा पूर्ण होणं अगदीं अशक्य असावं हेंसुद्धां कांहीं बरं नव्हे. लोकशाहींत असं असूं नये. अशा माणसाला मुलाखत द्यायची म्हटलं, तर पंतप्रधानांचा कितीसा वेळ जाईल? फार तर दोन मिनिटं. पण तेवढ्यानं त्या माणसाला केवढा हर्ष होईल! आणि पंतप्रधान आपल्यांतलेच आहेत अशा कल्पनेनं देशांतल्या लाखो सामान्य माणसांना केवढा आनंद वाटेल!... एखाद्या साध्या नागरिकाला पंतप्रधानापर्यंत जाऊन पोंचणं इतकं अशक्य आहे? शेकडो छोट्यामोठ्या हपीसरांच्या कडेकोट बंदोबस्तांत पंतप्रधान खरोखरच सामान्य माणसाच्या दृष्टीनं अगदीं गडप झालेले आहेत?...

त्यांच्या मनांत कांहीं तरी कल्पना आली असावी. त्यांचे ओठ हंसू आल्याप्रमाणं विलग झाले. त्यांनीं आपल्या मनगटावरच्या घड्याळांत पाहिलं. आपण पोषाख घालून तयार आहोंत याची खात्री करून घेण्यासाठीं आरशांतल्या प्रतिबिंबाकडे पाहिलं. मग त्यांनीं टेलिफोन उचलून म्हटलं,

"मला दिल्लीला ट्रंक कॉल हवा आहे. सेक्रेटारिअट!"

"सेक्रेटारिअट? जी हां!"

थोड्या वेळानं कॉल लागला. ते म्हणाले, "मला पंतप्रधानांशीं बोलायचं आहे."

दुसऱ्या टोकाशीं थोडी खोटी झाली. टेलिफोनवर खडखड आवाज झाला. पहिल्याहून निराळा, जरा घोगरा आणि आदबशीर आवाज ऐकूं आला, "कोण बोलतंय्?"

"माझं नांव रामचरण अग्रवाल."

"पंतप्रधानांशीं बोलायचं आहे आपल्याला?"

" जी हां."

" कशाबद्दल ?"

" मुलाखतीसाठीं वेळ ठरवून घ्यायची आहे. पंतप्रधानांची भेट घेण्याची इच्छा आहे."

" कोणत्या कामासाठीं ?"

" काम–?–अं...काम तसं कांहीं नाहीं. फक्त त्यांची गांठ हवी आहे. नमस्ते करून कुशल विचारण्यापुरती."

दुसऱ्या टोकाच्या इसमानं गोंधळल्याप्रमाणं पुटपुट केली, " आपली व पंतप्रधानांची पहेछान आहे ?"

" न...नाहीं. पण एक नागरिक या नात्यानं—"

" थांबा हं." फोन दुसऱ्या हातांत गेल्याप्रमाणें आवाज झाला. निराळी व्यक्ति बोलूं लागली. " हलो ! रामचरणसाहेब ? आपलं पंतप्रधानांशीं काय काम आहे तें मेहेरबानी करून सांगाल काय ?"

ते म्हणाले, " माझं काम असं कांहीं नाहीं. पण मी दूरच्या गांवाहून इथं राजधानींत आलों आहें; आणि पंतप्रधानांची भेट घेतां आली तर परत गांवीं गेल्यावर मोठ्या अभिमानानं तें मी लोकांना सांगेन आणि तें ऐकून माझ्या गांवकऱ्यांनाहि फार आनंद होईल."

फोनवरच्या माणसानं दोनदां खाकरल्यासारखं केलं व म्हटलं, " रामचरण-साहेब, आपल्याला हें ध्यानांत ठेवलं पाहिजे कीं पंतप्रधानांना क्षणाची देखील फुरसत नसते. कामावांचून कुणाला भेटत नाहींत ते."

" पण तसं म्हटलं तर माझ्यासारख्याची भेट घेणं हें देखील कामच नाहीं का ? पंतप्रधानांची भेट झाली, ते एखादा शब्द माझ्याशीं बोलले तर मला अभिमान वाटेल. हा देश माझा आहे, हें राज्य माझं आहे, पंतप्रधान माझे आहेत असं मला वाटेल. माझी हकीगत ऐकून साऱ्याच लोकांना तसं वाटेल. पंतप्रधान कुणालाहि भेटतात असं साऱ्यांना वाटूं लागेल. त्यांना पंतप्रधानांविषयीं आपुलकी वाटेल. हें काम कांहीं कमी महत्त्वाचं नाहीं—"

" हां—" फोनच्या दुसऱ्या टोकाशीं बोलणारी व्यक्ति हंसली असावी.

ते म्हणाले, " बघा तुम्हीच. दोन मिनिटं पंतप्रधान मला भेटतील असं करा. त्यांनाहि आनंद होईल अशी माझी कल्पना आहे—"

दुसऱ्या टोकाशीं कांहीं संभाषण आणि विनोद झाला असावा. " जरा थांबा हं ! "

" जरूर. " असं म्हणून त्यांनीं आपल्या घड्याळांत पाहिलं. अर्धे मिनिट गेल्यावर त्यांना पुन्हा ऐकूं आलं,

" हलो. "

" हां. "

" हें पाहा रामचरणसाहेब, तुम्ही मागतां तशी मुलाखत खरं म्हणजे देतां येत नाहीं. कुणी मागत नाहीं. पण—पण मीं पंतप्रधानांच्या उद्यांच्या कार्यक्रमांची यादी पाहिली, तेव्हां—"

" हं ? "

" उद्यां ते भयंकर कामांत आहेत. तथापि पांच मिनिटांचा अवधि काढतां येईल. दुपारीं १२–४५ ला ते आपल्या कचेरींत सह्या करीत बसलेले असतील. एक वाजतां ते जेवायसाठीं उठतील. एकाला पांच मिनिटं कमी असतांना तुम्ही आलांत तर तुमची—त्यांची दोन मिनिटांपुरती भेट होण्याची व्यवस्था मी करीन. दोन मिनिटं पुरतील ना तुम्हाला ? "

" रगड ! मी तुमचा फार आभारी आहें—"

" तुम्ही आपल्या नांवाची चिठी दारावर द्या. "

" ठीक ठीक. " असं म्हणून टेलिफोन बंद करतांना ते खुदकन् हंसले...पंतप्रधान भेटत नाहींत असं कसं होईल ? सामान्यांतल्या सामान्य नागरिकालाहि त्यांची मुलाखत मागण्याचा आणि ती मिळेल असं समजण्याचा हक्क आहे. तो आपला हक्क नाहींसा झाला कीं राज्याचा आधारच गेला...असं कधीं होतां कामा नये...

* * *

खोलीच्या दारावर टकटक् आवाज झाला. एक स्थूल गृहस्थ हंसत आंत आले व आदबीनं म्हणाले,

" पंतप्रधानांच्या भेटीसाठीं आलेलं इंडिअन चेंबर ऑफ कॉमर्सचं शिष्ट-मंडळ खालच्या दिवाणखान्यांत वाट पहात आहे. "

" मी पोषाख करून तयार आहें. "

" शिष्टमंडळाची भेट आटपली कीं पंतप्रधानांना ऑल इंडिया रेडिओंत जायचं आहे. ' माझं बालपण ' या विषयावर भाषण–"

खिशांतले कागद चाचपीत ते म्हणाले, " हां. भाषण घेतलं आहे मीं बरोबर. "

जिन्यावरून भराभर पायऱ्या उतरून जातांना ते मनाशीं विलक्षण प्रसन्नतेनं हंसत होते.

( कल्पना इंग्रजीवरून )

# ३ : दाढी

" नुसती दाढी. " खुर्चीत बसतां बसतां मीं सांगितलं.

माझ्याभोंवतीं एक जरासा मळकट, जाड पांढऱ्या कापडाचा तुकडा लपेटीत तो म्हणाला, " केस कापून घ्या कीं साहेब. वाढलेले दिसतात. "

मीं स्वतःच्या डोक्यावरून हात कुरवाळीत फिरविल्यासारखा करून म्हटलं, " हां, वाढले आहेत; पण आत्तां नाहीं कापून घेत. थोडा घाईत आहे. आत्तां नुसती दाढीच. "

" ठीक आहे, " असं म्हणून त्यानं कापडाचीं टोकं ओढून माझ्या मानेवर बसविलीं, माझं डोकं अलगद ओढून खुर्चीला लावलेल्या, वरखालीं सरकणाऱ्या पट्टीवर टेकविलं आणि मग पुढें माझ्या उजव्या हाताला येऊन ब्रश ओला करून साबणावर फिरवून, तो माझ्या दाढीवर चोळूं लागला. पाण्याच्या स्पर्शानं आणि साबणाच्या वासानं माझा थकवा जरा कमी झाला. मीं डोळे मिटून घेतले. आरशापुढच्या दगडी चौथऱ्यावर त्यानं ब्रश टेकला, त्याचा आवाज मीं ऐकला. मग चटफट् चटफट् असा आवाज माझ्या कानीं आला तेव्हां मीं ओळखलं, कीं हुकाला अडकविलेल्या चामड्याच्या पट्ट्यावर तो वस्तऱ्याला धार लावीत असावा. दुसऱ्याच क्षणीं माझ्या कानशिलापाशीं वस्तऱ्याचं पातं टेकवलं गेलं आणि चर्र असा आवाज झाला. निष्णात कारागिराला शोभेल असा त्याचा हलका हात होता... माझी हनुवटी बोटांनीं धरून, थोडी वळवून त्यानं माझ्या गालावरून वस्तरा ओढला आणि विचारलं, " आपण मुंबईस असतां काय ? "

दुकानांत शिरल्यावर माझी छोटी सूटकेस मीं बाकावर टेकली होती. तिच्यावर माझं नांव आणि त्याखालीं ' बॉंबे ' असं लिहिलेलं होतं. या छोट्याशा गांवांतल्या सलूनवाल्यानं इंग्रजी अक्षरं ओळखावीत याचं मला आश्चर्य वाटलं. पण असंहि मनांत आलं, कीं माझ्या सूटकेसवरचं नांव वाचून नव्हे, तर केवळ अनुमानधपक्यानं त्यानं मला विचारलं असावं.

मीं म्हटलं, " हं. "

बाहेरगांवच्या लोकांना मुंबईच्या माणसांबद्दल आदर कां असावा कोण जाणे, पण तो असतो खरा ! मीं " हं " म्हटल्याबरोबर त्याच्या चर्येवर एक नवीनच आदब दिसूं लागली. किंचित् मागं सरकून त्यानं माझ्याकडे निरखून पाहिलं आणि विशेषच कौशल्यानं दाढी बनविण्याचा निश्चय केल्याप्रमाणं त्यानं दूर ठेवलेला ब्रश उचलून घेऊन माझ्या गालावर आणि गळ्यावर फिरविण्यास प्रारंभ केला...त्यानं विचारलं, " मुंबईंत काय, बिझिनेस असेल ? "

त्याच्या तोंडचा ' बिझिनेस ' हा शब्द ऐकून माझी खात्री झाली, कीं कुग्रामांतला हा कारागीर बराच पुढारलेला आहे. ओठांवर आलेला साबणाचा फेस डाव्या हाताच्या बोटानं दूर करीत मीं म्हटलं, " हं. "

" आपलं दुकान असेल ? "

" नाहीं. सिंगर कंपनीच्या शिवण्याच्या यंत्रांची एजन्सी आहे माझ्याकडे. या भागांत फिरतीवर आलों आहें. तुमच्या या गांवांत किती यंत्रं खपवितां येतील मला ? "

" तें काय सांगावं साहेब ? लोकांच्या खिशांत दिडक्या उरल्या नाहींत. सगळ्याच धंद्यांत मंदी आली आहे, आपण पाहतांच. "

" तुमच्या धंद्याला नसेल आली ? "

" असं नका समजूं. आमच्याहि धंद्याला आली आहे. "

" होय ? "

" तुम्हांला खरं वाटणार नाहीं, पण महिन्यानं केस कापणारा माणूस आतां दोन महिन्यांनीं कापतो. इथल्या शाळेचे हेडमास्तर रोज येऊन दाढी करून घ्यायचे; पण आतां त्यांनीं सोमवार आणि गुरुवार असे दोनच दिवस ठरविले आहेत दाढी करण्याचे. गांवांतलीं तरणींताठीं पोरं तर बारा आण्यांचा सेफ्टी वापरून आपलं काम भागवितात. आमच्या कलेचं चीज पूर्वीसारखं नाहीं राहिलं. उदार माणसं भेटेनाशीं झालीं आहेत. "

" हां, खरं आहे. " असं म्हणून मी गप्प बसलों. त्याचंहि बोलणं बंद झालं. पण लगेच क्षणभरानं तो म्हणाला,

" उदारपणावरून आठवण झाली, साहेब. एक उदार गृहस्थ मला भेटले नसते तर मीं हें दुकान काढलं नसतं. हकीकत ऐकण्यासारखी आहे. मी एक साधा कोपऱ्यावर बसणारा न्हावी होतों. एक दिवस एक गडी कोपऱ्यावर आला अन् त्यानं मला बोलावून नेलं. ज्या घरांत गेलों तिथं मी पूर्वी पुष्कळदां गेलों होतों. पण ज्यांची दाढी केली त्यांना मीं पूर्वीं गांवांत कधीं पाहिलं नव्हतं. दाढी झाल्यावर त्यांनीं मला विचारलं, मालीश करतां येतं का ? मीं म्हटलं, बघा साहेब. माझ्या कामावर ते खूष झाले. आणि रोज येत जा म्हणून त्यांनीं मला सांगितलं. मी रोज जाऊं लागलों. सातोस्करांच्या छापखान्याचे मॅनेजर म्हणून ते या गांवीं आले होते. इकडे येण्यापूर्वीं ते कुठं होते तें कुणालाहि माहीत नव्हतं. कुणीं विचारलं तर तो विषय ते कटाप करीत. सातोस्करांना देखील माहीत नव्हतं. मॅनेजरचं काम ते अगदीं चोख करीत असत; सातोस्करांना जास्त चौकशी काय करायची होती ? सारे लोक त्यांना मंगेशराव म्हणत. गृहस्थ मोठे रसिक, खर्चिक आणि चंगीभंगी होते. त्यांचा मित्रपरिवार वाढायला वेळ लागला नाहीं. सातोस्करांना मूलबाळ नव्हतं. ते थकले तेव्हां छापखाना मंगेशरावांनीं घेतला..."

सांगतां सांगतां तो थांबला आणि हुकाला अडकवलेली चामड्याची पट्टी ओढून घेऊन तिच्यावर त्यानं वस्तरा चटफट् चटफट् करून फिरविला. वस्तऱ्याला धार लावायला हवी होती म्हणून नव्हे; त्याला कांहीं तरी चाळा करावासा वाटला म्हणून. मग बोटांनीं माझी हनुवटी धरून वस्तरा हातांत परजीत तो पुढं सांगूं लागला—

" मंगेशरावांना चांगली श्रीमंती आली. एक दिवस ते मला म्हणाले, ' तूं कोपऱ्यावर किती दिवस बसणार ? ' मीं म्हटलं, ' मरेपर्यंत. आमच्या कितीक पिढ्या अशाच बसल्या, मीहि बसणार. ' ते म्हणाले, ' असं करूं नकोस, सलून काढ. ' मीं म्हटलं, ' पैसे कुठले आणूं ? घरांत दोन बायका आहेत, आठ मुलं आहेत, तीन विधवा बहिणी आहेत; कवडी देखील शिल्लक नाहीं. सलून काढायचं म्हणजे दोन अडीचशे तर रुपये हवेत ? ' ते कांहीं बोलले नाहींत. पण मालीश आटपल्यावर ते उठले आणि आंत जाऊन येऊन नोटांचं पुडकं माझ्या अंगावर फेकून म्हणाले,

'एवढे पुरतील ना?' मीं सलून काढलं, माझा जम उत्तम बसला. पण दोन वर्षांनीं मंगेशरावांना पैसे परत द्यायला लागलों तर ते घेईनात! ते म्हणाले, 'दिले ते परत घ्यायसाठीं दिले नाहींत.' खरं म्हणजे त्या वेळेस ते स्वतः फार अडचणींत होते. असा उदार माणूस आतां भेटेल का, सांगा साहेब!"

त्याच्या त्या उद्गाराला उत्तेजन देण्यासारखं मी कांहींतरी पुटपुटलों. त्यानं वस्तऱ्याला पुन्हा धार लावली आणि माझी हनुवटी उचलून वस्तरा गळ्याखालीं धरून तो म्हणाला,

"मंगेशरावांना अखेर वाईट मरण आलं तें त्यांच्या उदारपणामुळंच. कुणीं पैसे मागितले कीं खिशांत हात घालायचा आणि हाताला येतील तेवढे पैसे बाहेर काढून द्यायचे, ही त्यांची खोड त्यांना भोवली. मी त्यांना पुष्कळदां हळूच सांगें, 'असं वागूं नका.' पण ते दर वेळेस म्हणत, 'अरे, पैसा काय आपल्याबरोबर येणार आहे? आपल्या नशिबांत असेल तेवढा हातांत खेळेल.' हें म्हणतांना दर वेळेस ते कपाळावर बोट टेकीत आणि त्यांना पूर्वीं कधीं तरी झालेल्या जखमेची कपाळावरची आडवी खूण मला दिसे—"

तें ऐकतांच मीं एकदम चमकून विचारलं, "कपाळावरची खूण? तुमच्या मंगेशरावांच्या कपाळावर मोठी खूण होती म्हणतां? त्यांचा एखादा फोटो आहे तुमच्याजवळ?"

तो म्हणाला, "त्यांच्या कृपेनं निघालेलं माझं हें दुकान, इथें त्यांचा फोटो नसेल असं कसं होईल? दत्ताचा फोटो नाहीं मीं ठेवला, त्यांचा ठेवलाय्. आणि त्यांचा शेवट सोमवारीं झाला म्हणून दर सोमवारीं त्यांच्या फोटोला मी माळ घालतों. तो बघा."

मला लांबून नीट दिसेना म्हणून मीं म्हटलं, "जरा फोटो काढून माझ्याजवळ देतां का?"

त्यानं त्याप्रमाणं केलं. फोटो जवळ धरल्याबरोबर माझा संशय फिटला! चौदा वर्षांपूर्वीं मुंबईतून नाहींसा झालेला श्रीपतराव आणि मंगेशराव या दोन्ही व्यक्ती एकच होत्या. माझ्या मनांतला हा विचार मीं अर्थात् बोलून दाखविला नाहीं. सलूनवाल्यानं मला विचारलं,

" हाडापेरानं उंच होते, नाकाडोळयांनीं तरतरीत होते. दिलदार माणूस दिसतो कीं नाहीं फोटोंतसुद्धां ?"

मीं म्हटलं, " हं."

तो पुढें बोलूं लागला,

" छापखाना अगदीं उत्तम चालला होता. पण त्यांतली कमाई आणि यांचा उदारपणा यांची तोंडमिळवणी होणं दिवसेंदिवस कठीण होऊं लागलं. कोणतीहि चैन एकट्यानं कधीं करायची नाहीं ही यांची संवय. आणि गरजू माणूस आला कीं त्याला विन्मुख पाठवायचा नाहीं हा यांचा खाक्या ! मग पैसे कसे पुरायचे ? छापखान्याला कर्ज व्हायला लागलं. अखेर सावकारांनीं तो घशांत घातला. एक बाई ठेवली होती ती उनाड निघाली आणि चोरी करून पळून गेली ! सगळ्यांत या गोष्टीचा धक्का त्यांना जबर बसला, त्यांनीं अंथरूण धरलं. त्या दुखण्यांतून ते उठले नाहींत. असा उदार पुरुष कधीं भेटायचा नाहीं. मीच कशाला, या गांवांतल्या कुणाहि माणसाला विचारा, तो म्हणेल, " मंगेशराव ना, मोठा उदार माणूस !..."

त्याचं बोलणं ऐकतां ऐकतां माझ्या मनांत चौदा वर्षांपूर्वींच्या आठवणी येत होत्या. छापखान्याच्या धंद्यांत यशस्वी झालेला श्रीपतराव रेस कशी खेळूं लागला, उत्तरोत्तर त्याचा पाय खोलांत कसा जाऊं लागला, पैशाच्या अडचणींमुळं त्याची दानत कशी बिघडूं लागली, लोकांचीं ऋणं तो कशीं बुडवूं लागला, खोटे चेक कसे देऊं लागला आणि अखेर कर्जाचा अनावर बुजबुजाट झाल्यावर एके दिवशीं अकस्मात् नाहींसा कसा झाला—तो सारा इतिहास माझ्या डोळ्यांपुढें उभा राहिला. मला स्वतःला चारपांच हजारांचा फटका बसला होता ! पण माझ्यापेक्षांहि मोठाले फटके कित्येकांना बसले होते. सावकारांनीं श्रीपतरावाचा छापखाना ताब्यांत घेतला, पण कुणाच्या चार टक्क्यांचीसुद्धां फेड झाली नाहीं. जे बुडाले ते कांहीं दिवस तळमळले, श्रीपतरावाची वाट पाहात राहिले. पण वर्षांमागून वर्षे गेलीं तेव्हां सगळ्यांनीं ठरविलं, कीं श्रीपतरावानं आत्महत्या केली असली पाहिजे. क्वचित् कुणीं बातमी आणली कीं तो गोव्यांत आहे. पण तिच्यावर कुणाचा विश्वास बसत नसे; माझाहि कधीं बसला नव्हता...आणि आतां श्रीपतरावाचा शोध मला लागला होता ! या गांवांत मंगेशराव या नांवानं चौदा वर्षे काढून आपली

जीवितयात्रा त्यानं संपविली होती. मुंबईत त्यानं अब्रू साफ घालविली होती; या गांवांत मिळविली होती. मुंबईत त्याला कुणी चांगलं म्हणायला तयार नव्हतं. उलट, या गांवांत कुणालाहि विचारा; तो म्हणेल, " मंगेशराव ना, मोठा उदार माणूस ! "

हातांतल्या फोटोकडे मी निरखून पाहूं लागलों. मनाशीं विचार केला, आपल्याला जें ठाऊक आहे तें कशाला बोलायचं ? या गांवांत श्रीपतरावानं जी आपली सुंदर छबी निर्माण केली होती ती कशाला पुसायची ? सलून-वाल्याच्या हातीं फोटो देत मीं म्हटलं, " अशीं माणसं विरळा ! "

" यांनीं कधीं कुणाची पै बुडविली नाहीं. जन्मभर दुसऱ्यावर उपकारच केले ! " असं म्हणून त्यानं फोटो जागच्या जागीं ठेवला आणि माझ्याजवळ येऊन दाढी पुढें चालू केली.

दाढी आटपल्यावर मीं कपडे घातले आणि त्याच्या हातावर आठ आणे ठेवून निघालों. त्यानं विचारलं, " आपण मुंबईचीं माणसं. काम मनाजोगं झालं ना ? "

मी हसलों आणि मान हालविली.

तो म्हणाला, " उद्यांहि या साहेब. "

" अवश्य येईन ! " असं म्हणून मीं आपली सूटकेस उचलली आणि बाहेर पडलों. सिंगरचीं शिलाईचीं यंत्रं या गांवांत किती खपवितां येतील त्याचा विचार करीत मी बाजारपेठेकडे वळलों.

# ४ : जादूचा अद्‌भुत प्रयोग !

ॲलेक्झांडर बॉट्स,
अर्थवर्म सेल्स मॅनेजर
कॅंप: टायलर्व्हिल, जॉर्जिआ,
यांजकडून—

गिल्बर्ट हेंडरसन,
प्रेसिडेंट, अर्थवर्म ट्रॅक्टर कंपनी
अर्थवर्म सिटी, इलिनॉइस, यांस.

तारीख १२ फेब्रुवारी १९४९

महाशय,

आपल्या अर्थवर्म कंपनीचा ए. सी. १०० किलोवॅट डीझेल जनरेटर आणि एक उत्तम वकील इकडे ताबडतोब रवाना करावा, अशी मीं जी तार केली ती आपल्या हातीं पडली असेलच. एका विलक्षण संकटांत सापडल्यामुळेंच मला ती तार करावी लागली; आणि हें संकट कसं उत्पन्न झालं त्याबद्दलची समग्र हकीगत आपणांस कळवावी म्हणून हें सविस्तर पत्र आतां मी लिहीत आहें.

आज दुपारीं आपल्या कंपनीचे येथील विक्रेते मिस्टर टायलर यांच्या वखारींत ट्रॅक्टर वगैरे सर्व तपासणी करण्यासाठीं मी गेलों असतांना एक गृहस्थ त्या ठिकाणीं आला. उण्यापुऱ्या उंचीचा, भडक पोषाखाचा, काळ्याभोर मिशांचा, रुबाबदार असा तो गृहस्थ होता. आंत आल्याबरोबर तो खणखणीत आवाजांत म्हणाला,

“ गुड मॉर्निंग सर. या वखारीचे मालक आपणच काय ? ”

मीं म्हटलं, “ नाहीं. मालक बाहेर गेले आहेत. पण तुम्हांला कांहीं घ्यायचं असेल तर मला सांगा. अर्थवर्म ट्रॅक्टर कंपनीचा मी सेल्स मॅनेजर आहें. माझं नांव ॲलेक्झांडर बॉट्स. ”

" ओहो ! मिस्टर बॉट्स !" तो म्हणाला, " तुमची कीर्ति मीं ऐकलेली आहे. मला वाटतं, तुमचं आमचं सहकार्य होऊं शकेल."

आम्हीं एकमेकांशीं हस्तांदोलन केलं. त्यानं आपल्या नांवाचं कार्ड माझ्या हातीं दिलं. त्यावर खालील मजकूर छापलेला होता:

**सायरस ऑगस्टस कॉनवे**

**मालक आणि मॅनेजर**

**कॉनवे कार्निव्हल**

कार्ड वाचल्यानंतर मीं त्याला म्हटलं, " तुमची ओळख झाल्याबद्दल मला फार आनंद होतो. आपल्या मनांत काय आहे ? बोला."

" तुमचं आमचं परस्पर सहकार्य व्हावं अशी इच्छा आहे. तुम्हांला उपयोगीं पडतील अशा माझ्या धंद्यांतील कांहीं कल्पना मी तुम्हांला विकूं इच्छितों. उलट बाहेरच्या मोकळ्या आवारांत तुमच्या कंपनीचा वीज उत्पन्न करण्याचा जो जनरेटर कॅनव्हसखालीं झाकून ठेवलेला आहे तो तुमच्यापासून मी विकत घेणार आहें. सकाळीं तुमचीं माणसं तो आणून ठेवीत होतीं तेव्हांच मीं तो पाहिला होता; पण आत्तां तिसऱ्या प्रहरीं तो मीं विकत घ्यायचं ठरविलें आहे. या जनरेटरची किती किंमत आहे ?"

" दहा हजार डॉलर्स."

" ठीक आहे. मिस्टर बॉट्स, हा जनरेटर मीं घेतला असं समजा."

मीं मान हलवून म्हटलं, " अंहं. हा जनरेटर कंपनीनं हेन्री हबर्ड नांवाच्या गृहस्थांना विकला आहे. त्यांच्यासाठींच तो इथं आणून ठेवण्यांत आला आहे. ते ट्रक आणतील आणि हा जनरेटर घेऊन जातील."

" मग तुम्ही दुसरा जनरेटर मला देऊं शकाल ?"

मीं म्हटलं, " जरूर. तुमची ऑर्डर मी कंपनीला तारेनं कळवितों. कंपनी जनरेटर ताबडतोब रवाना करील. तुम्हांला तो दोन आठवड्यांत मिळेल."

" छे छे ! मला तर जनरेटर आत्तांच्या आत्तां हवा."

मीं विचारलं, " कां ?"

" इथून दक्षिणेकडे एक मैलाच्या अंतरावर माझ्या कार्निव्हलचा जंगी तंबू मीं ठोकला आहे. माझ्या कार्निव्हलमधें कितीक पाळणे, कितीक चक्रं, छोटेछोटे

तंबू आहेत आणि रोषणाई करण्यासाठीं हजारो दिवे आहेत. कार्निव्हलचा तंबू तर मी ठोकून बसलों आहें. पण एक चक्र फिरेल तर शपथ, किंवा एक दिवा लागेल तर शपथ ! कारण या शहराची वीज कंपनी म्हणते माझा तंबू फ्लॉरिडा संस्थानच्या हद्दींत आहे व तिथं वीज देतां येणार नाहीं. फ्लॉरिडा संस्थानांतली वीज घ्यावी तर कित्येक मैलांची लाईन मला माझ्या खर्चानं टाकायला हवी. माझं तर विजेवांचून आत्तां अडलेलं आहे. आज रात्रीं कार्निव्हल सुरू व्हावा यासाठीं वीज उत्पन्न करण्याची व्यवस्था माझी मींच केली पाहिजे. म्हणून तुमच्याकडून जनरेटर विकत घ्यायचं मीं ठरविलं आहे. मला जनरेटर ताबडतोब पाहिजे. "

मीं मान हलवून म्हटलं, " तुम्हांला ताबडतोब जनरेटर देणं शक्य नाहीं."

तो म्हणाला, " मिस्टर बॉट्स, या जगांत अशक्य कांहीं नाहीं. तुम्ही मनांत आणाल तर बाहेर कॅनव्हसखालीं ठेवलेला जनरेटर तुम्ही मला देऊं शकाल. माझं हें म्हणणं तुम्हांला पटण्यासाठीं मीं अगदीं प्रथम काय म्हटलं त्याची आठवण काढा. लोकांची करमणूक करण्याचा माझा धंदा आहे. या धंद्यांतल्या कांहीं युक्त्या मी तुम्हांला दाखवितों. त्या तुम्हांलाहि तुमच्या धंद्यांत उपयोगीं पडतील. "

त्याची ती बडबड मला चमत्कारिक वाटली. मीं म्हटलं, " तुम्ही काय म्हणतां मला कळत नाहीं. "

" कळेल, कळेल. " असं म्हणत त्यानं खिशांतून पत्त्यांचा जोड काढला आणि तो माझ्यापुढं पंख्याप्रमाणं पसरून म्हटलं, " तुम्हांला वाटेल तो पत्ता घ्या. "

त्याचा काय बेत होता मला समजेना. पण मीं एक पत्ता काढून घेतला. ती बदामची दुरी होती.

कॉनवेची बडबड सारखी चालू होती. " मिस्टर बॉट्स, तो पत्ता जरा वेळ आपल्या हातांतच ठेवा. मला तो बिलकुल दिसणार नाहीं अशी खबरदारी घ्या हं. आमच्या धंद्यांतल्या एका शाखेला जादू म्हणतात. हातचलाखी, योगसाधन, वशीकरण अशींहि नांवं कुणीकुणी देतात–"

मीं मधेंच विचारलं, " पण मिस्टर कॉनवे, आमच्या ट्रॅक्टर आणि जनरेटर विकण्याच्या धंद्याशीं तुमच्या जादूचा काय संबंध ? "

तो म्हणाला, " मिस्टर बॉट्स, कृपा करा आणि मधेंच बोलूं नका. मी तुम्हांला जो चमत्कार दाखविणार आहें त्याचा एक अनुक्रम ठरलेला आहे. त्यांत व्यत्यय नका आणूं." त्यानं एक साधं कागदाचं पाकीट आपल्या खिशांतून काढलं आणि तें माझ्यापुढं करून म्हटलं, " तुमच्या हातांतील पत्ता या पाकिटांत घालून तें बंद करा. मला तो पत्ता बिलकुल दिसणार नाहीं अशी काळजी घ्या हं...शाबास, ठीक. आतां असं करा. त्या पाकिटावर तुमच्या नांवाचीं आद्याक्षरं लिहा. कारण तें बदललं कीं काय तें तुम्हांला पाहतां आलं पाहिजे...अस्सं. छान! आतां या जादूचा पुढचा भाग करण्यासाठीं इथं उभं राहून उपयोगीं नाहीं. जरा दूर गेलं पाहिजे."

त्यानं माझ्या दंडाला धरून वखारीच्या दुसऱ्या टोकाकडे नेलं आणि खिशांतून एक चांदीची चपटी डबी काढली. ज्या पाकिटांत बदामची दुरी होती तें पाकीट त्याच्या सांगण्यावरून मीं त्या चांदीच्या डबींत घातलं, डबीला किल्ली होती ती फिरवून कुलूप लावलं आणि किल्ली हातांत धरली. मला राहवेना म्हणून मीं त्याला म्हटलं,

" माफ करा मिस्टर कॉनवे, तुम्हीं काय चालविलं आहे मला समजत नाहीं."

तो म्हणाला, " समजेल, समजेल. मला येवढंच सांगा, ही पेटी आतां पक्की बंद झाली आहे किंवा नाहीं? तुम्हीं पेटीचं कुलूप अगदीं पक्कं बंद केलं आहे?...ठीक. मग ती किल्ली आतां तुमच्या हातांत ठेवा आणि ती पेटी माझ्याकडे द्या. ठीक. आतां आपण असं करूं—" त्यानं खिशांतून एक सुतळीचं बंडल काढलं. " ही सुतळी चांगली वीस पंचवीस यार्ड उलगडा, तिचं टोक हातांत धरा, आणखी बंडल त्या वरच्या बहालाला वळसा घालून खालीं येईल अशा बेतानं फेका. हं. एक, दोन, तीन. शाबास. आतां दोरीच्या दोन्ही टोकांना ही पेटी मी बांधतों बघा. बांधली? आतां ती पेटी हवेंत झुलते आहे ना, तिच्याकडे बघा. आतां आपण दोघेहि थोडं मागं सरकूं या...आस्ते, सांभाळा! तुम्ही पडत होतां म्हणून तुमचा दंड धरला हं, माफ करा. पेटीवरची तुमची दृष्टि ढळूं देऊं नका हं. बस! थांबा!"

मीं गोंधळून विचारलं, " आतां पुढें काय?"

" आतां मी एक मंत्र म्हणणार आहें. तो म्हटला कीं या एकंदर अफाट विश्वाच्या पोकळींत ज्या ठिकाणीं तुमचं पाकीट या क्षणाला आहे तिथून तें नाहींसं होणार आहे ! आणि तुम्हांला कल्पनाहि नसेल अशा दुसऱ्या एका जागीं प्रगट होणार आहे. आतां तुम्हीं बोलायचं मात्र अगदीं नाहीं ! गप्प ! मी मंत्र म्हणतों...' ओल्ड बॉबास्टस, थिओफेरस्टस, पॅरासेल्सस, होहेनहाईम ! जाव ! चले जाव ! निकल जाव ! अब्बीके अब्बी ! '..."

हें म्हणतां म्हणतां त्यानं खिशांतून एक पिस्तूल काढलं आणि काड्दिशीं उडविलं !

मग तो माझ्याकडे वळून म्हणाला, " मिस्टर बॉट्स, आतां तुम्ही पुढं व्हा. दोरी सोडून पेटी घ्या आणि पेटी उघडून आंत तुमचं पाकीट आहे का सांगा. "

मीं त्याप्रमाणं केलं. पेटी रिकामी होती !

तो म्हणाला, " नाहींसं झालं बघितलंत तुमचं पाकीट ? तें कुठं गेलं आहे याची कांहीं तुम्हांला कल्पना आहे ? "

" नाहीं. "

" वा महाराज ! तुमच्याच कोटाच्या खिशांत तें असून नाहीं म्हणतां ? घाला खिशांत हात आणि काढा तें पाकीट. "

मीं खिशांत हात घातला तों तिथं पाकीट खरोखरच निघालं ! त्यावर माझ्या नांवाचीं आद्याक्षरं होतीं. आंत बदामची दुरी होती !

मीं म्हटलं, " तुमचा जादूचा प्रयोग मला आवडला. तुम्हीं माझं लक्ष नाहीं असं पाहून पाकीट माझ्या खिशांत घातलं असलं पाहिजे. पण तुमच्या या विद्येचा मला काय उपयोग ? दोन दिडक्यांचा पत्ता नाहींसा करणं निराळं, आणि ट्रॅक्टर, जनरेटर खपविणं निराळं. पत्ता जागच्या हलविलात तसा तुमचा तो अगडबंब मंत्र म्हणून ट्रॅक्टर किंवा जनरेटर हलवितां येईल का तुम्हांला ? "

तो म्हणाला, " कां नाहीं येणार ? जरूर येईल. आत्तांच करून दाखवितों प्रयोग वाटलं तर. पण त्यासाठीं तुमच्या स्वभावाचं ज्ञान मला पुरतं झालं पाहिजे. माणसाच्या हस्ताक्षरावरून स्वभाव ओळखण्याची विद्या मीं हस्तगत केलेली आहे. तुमची सही देतां का मला एका कागदावर ? "

त्यानं खिशांतून एक कागदाची घडी काढली आणि ती माझ्यापुढें करून व स्वतःच्या खिशाला लावलेलं फाऊंटनपेन काढून तें माझ्या हातीं देत तो म्हणाला,

" या कागदावर या ठिकाणीं सही करा बघूं. "

मीं सही केली. तिच्याकडे पाहात तो म्हणाला, " तुमच्या अक्षरावरून तुम्ही मोठ्या उमद्या मनाचे आणि सढळ हाताचे गृहस्थ दिसतां. छान. मिस्टर बॉट्स, आतां आपण वखारीच्या जरा बाहेर जाऊं या. "

रस्त्यावरून कांहीं माणसं, इकडे तिकडे हिंडत होतीं. त्यांना हांका मारून कॉनवे म्हणाला, " आजच्या कार्निव्हलसाठीं फुकट तिकिटं कुणाला हवीं असतील तर त्यांनीं इकडे यावं ! पाहिजे आहेत काय कुणाला फुकट तिकिटं ? " दोन पुरुष आणि दोन स्त्रिया जवळ आल्या. त्यांना तिकिटं फाडून देऊन तो म्हणाला, " प्रत्येक तिकिटाला एक एक कुपन आहे. त्याच्यावर सही करा आणि माझ्याकडे परत करा. पुढच्या आठवड्यांत एक मोठं बक्षीस आम्ही देणार आहोंत त्यावर या कुपनांमुळें तुमचा हक्क राहील."

त्या चौघांनीं कुपनांवर सह्या करून तीं परत दिल्यावर कॉनवेनं खिशांतून ल्हानशी जादूची कांडी काढली व जनरेटरचं अवजड यंत्र ज्या कॅनव्हसखालीं टाकून ठेवलं होतं त्या कॅनव्हसवर ती कांडी हलके हलके मारीत तो आम्हां पांचीजणांकडे बघत म्हणाला,

" सभ्य स्त्रीपुरुषहो, जादुगिरीच्या इतिहासांत आजपर्यंत कधीं कुणीं केला नसेल असा अपूर्व प्रयोग मी आतां करणार आहें. मी माझ्या जादूचा मंत्र म्हणूं लागल्यापासून अवघ्या अर्ध्या मिनिटाच्या आंत हा सहा टन वजनाचा जनरेटर या ठिकाणावरून नाहींसा होईल आणि इथून एक मैलाच्या अंतरावर माझ्या कार्निव्हलच्या जागेंत तो व्यवस्थित बसविलेल्या स्थितींत प्रगट होईल ! काय मिस्टर बॉट्स, स्थलांतराचा हा अद्भुत प्रयोग मी करून दाखवीन यावर तुमचा विश्वास बसतो कीं नाहीं ? "

मीं म्हटलं, " मुळींच नाहीं. "

" मग हा अशक्य चमत्कार मीं करून दाखविला तर हा जनरेटर मला विकायला तुम्ही तयार व्हाल काय ? "

" विकायला ? अरे, तुम्ही जादूची असली करामत करून दाखविली तर हा जनरेटर मी तुम्हांला आनंदानं मोफत बक्षीस देईन ! "

कॉनवे म्हणाला, " मला तुमच्यापासून जनरेटर बक्षीस नको आहे. विकत हवा आहे. एका डॉलरला विकत द्याल का सांगा. "

मीं म्हटलं, " ठीक आहे, देईन. "

" पण हा जनरेटर तुमच्या मालकीचा आहे ना ? का ज्याची ही वखार आहे त्या एजंटाच्या मालकीचा आहे ? "

" नाहीं, नाहीं. अजून या जनरेटरची मालकी अर्थवर्म ट्रॅक्टर कंपनीकडे आहे आणि या कंपनीचा मी कायदेशीर प्रतिनिधि आहें. "

" ठीक आहे. पण तुमचा आमचा करार पुन्हा एकदां हडसून खडसून होऊं द्या. माझा मंत्र मी म्हणूं लागल्यापासून अर्ध्या मिनिटाच्या आंत हा जनरेटर या जागेवरून नाहींसा झाला आणि माझ्या कार्निव्हलच्या जागेंत जाऊन बसला तर तुम्ही तो मला एका डॉलरला विकत देणार आहांत, असा ठरला ना आपला करार ? "

मीं म्हटलं, " होय, ठरला. "

" ठीक. हा घ्या तुमचा डॉलर. नीट हातांत धरून ठेवा. आतां कृपा करून तुमचं घड्याळ काढा आणि वेळ मोजा. केव्हां प्रयोगाला सुरवात करूं तें तुम्हीच सांगा. "

मीं आपलं घड्याळ हातांत काढलं आणि सेकंद काट्याकडे पाहात म्हटलं, " हं, होऊं द्या सुरू. "

कॉनवेनं आपली जादूची कांडी फिरविली आणि मंत्र म्हणण्यास प्रारंभ केला, " ओल्ड बॅंबास्टस, थिओफ्रेसस्टस, पॅरासेल्सस, होहेनहाईम ! जाव, चले जाव यहांसे ! अब्बीके अब्बी ! निकल जाव ! " त्यानं आपल्या खिशांतून पट्कन् पिस्तुल काढलं, बार उडविला आणि माझ्यापुढें मस्तक झुकवून मला विचारलं, " किती वेळ लागला ? बोला. "

मीं म्हटलं, " दहा सेकंद ! पण घडलं कांहींच नाहीं ! "

कॉनवे म्हणाला, " मिस्टर बॉट्स, तुम्ही चुकतां. कितीतरी गोष्टी घडल्या आहेत. या चार माणसांच्या सह्या आणि पत्ते माझ्याजवळ आहेत. तुमच्या माझ्यांत जो तोंडी करार झाला त्याबद्दलची साक्ष ही मंडळी केव्हांहि

देतील. आपल्यांत ठरलेला करार पुरा झाला आहे. जनरेटर माझ्या कार्निव्हलच्या जागेंत जाऊन व्यवस्थित बसला आहे. डॉलर तुमच्या हातांत आहे. जनरेटरची विक्री पूर्ण झालेली आहे. विक्रीखतावर तुमची सही आहे. ही पाहिलीत?" असं म्हणून मघांशीं मीं ज्या कागदावर सही केली होती तो कागद त्यानं माझ्यापुढें धरला.

मीं म्हटलं, "होय, ही सही माझी आहे खरी."

कॉनवेनं त्या कागदाची घडी उघडून माझ्यापुढं धरली. पाहतों तों व्यवस्थित टाइप केलेलं विक्रीखत होतं तें! आणि त्याच्या तळाशीं मीं माझी सही केलेली होती!

मी साफ चाटच पडलों! आणि काय बोलावं तें मला सुचण्यापूर्वींच विक्रीखताची घडी खिशांत घालून मिस्टर कॉनवे झपाझपा पावलं टाकीत दूर गेला, एका मोटारींत चढून बसला आणि निघून गेला!

माझा आश्चर्याचा धक्का ओसरला, तेव्हां जनरेटरवर घातलेलं कॅनव्हस मीं उचलून बघितलं. पाहतों तों त्या ठिकाणीं जनरेटर होता कुठें? त्याऐवजीं जनरेटरच्याच आकाराचा बनविलेला एक खोक्याचा सांगाडा होता!

मग मात्र मी धांवत सुटलों. एक टॅक्सी केली आणि कार्निव्हलच्या जागीं गेलों. तिथं एका बाजूस जनरेटर खरोखरच बसविलेला दिसला. दोन चार दांडग्या शरीराचे कामगार जनरेटरच्या तारांची जोडाजोड करीत होते. कॉनवे त्यांच्या कामावर देखरेख करीत होता.

"अरे भामट्या!" मी ओरडलों. "जादूच्या प्रयोगाचं नाटक करून जनरेटर गंडविलास काय?"

"गंडविला?" कॉनवे हंसून म्हणाला, "तुमचा आमचा व्यवहार पूर्ण कायदेशीर झालेला आहे, महाराज!"

मीं ओरडून म्हटलं, "बिलकूल कायदेशीर नाहीं! आणि तूं पक्कं लक्षांत ठेव, मी हा जनरेटर तुला पचूं देणार नाहीं."

कॉनवे आपल्या हाताखालच्या कामगारांना म्हणाला, "हे गृहस्थ मला विनाकारण त्रास देत आहेत. ह्यांना इथून दूर न्या पाहूं."

मीं म्हटलं, "आत्तां तुम्ही मला घालवाल. पण मी पुन्हां येईन. आणि येईन तो आमचा एक ट्रॅक्टर घेऊन येईन आणि जनरेटर इथून घेऊन जाईन !"

त्या कामगारांनीं मला उचलून फाटकाच्या बाहेर फेकून दिलं !

मीं विचार केला, ट्रॅक्टर घेऊन येण्यांत कांहीं अर्थ नाहीं. टॅक्सींत बसलों आणि टायलरच्या घरीं गेलों. तिथून टायलरच्या ओळखीच्या एका वकिलाकडे गेलों. त्याला सगळी हकीगत सांगितली. पण तो वकील कसला रड्या ? तो मलाच शहाणपणा शिकवूं लागला, कीं जनरेटर जाऊन बसला आहे फ्लॉरिडाच्या हद्दींत. फिर्याद दाखल करायची झाली तर त्या संस्थानांत केली पाहिजे. आणि शिवाय फिर्यादींतून कांहीं निष्पन्न होणार नाहीं. कारण तुम्ही सरळ विक्रीखतावर राजीखुषीनं सही केलेली आहे !"

मीं म्हटलं, "म्हणजे एका बदमाषाची भामटेगिरी तुम्ही त्याला पचूं देणार होय ? फार शहाणे वकील दिसतां !" असं म्हणून मीं त्याला शिव्या दिल्या, आणि तिथून निघून हॉटेलवर आलों व नवा जनरेटर आणि एक उत्तम वकील ताबडतोब पाठवून देण्याबद्दल मीं तुम्हांला तार केली.

त्यानंतर हा समग्र वृत्तांत मीं लिहून काढला आहे व तुम्हांला पाठवीत आहे. जो जनरेटर त्या बदमाष कार्निव्हलवाल्यानं पळविला, तो मिस्टर हबर्ड यांना दिला होता. त्यांना जनरेटर वेळेवर दिला नाहीं तर ते कंपनीच्या नांवानं ओरडत सुटतील. तेव्हां त्यांना द्यावयासाठीं एक जनरेटर ताबडतोब रवाना करा आणि या बदमाष कार्निव्हलवाल्यानं नेलेला जनरेटर सोडवून आणण्यासाठीं कायदेशीर इलाज केला पाहिजे, तेव्हां एक उत्तम वकील ताबडतोब पाठवून द्या. जनरेटर आणि वकील यांची मी वाट पहात आहें.

आपला,
ॲलेक्झांडर बॉट्स.

## ५ : मंत्र उलटला !

अर्थवर्म ट्रॅक्टर कंपनीचे अध्यक्ष मिस्टर गिलबर्ट हेंडरसन यांच्याकडून बॉट्स यांना तारीख १४ फेब्रुआरी रोजीं तार आली. तारेंत पुढील मजकूर होता :

" तुमची तार मिळाली. तुमचं पत्रहि मिळालं. तुमच्या मूर्खपणानं गेलेला जनरेटर ज्यांनीं खरेदी केला होता त्या मिस्टर हबर्ड यांच्याकडूनहि संतापाच्या दोन तीन तारा मला आल्या आहेत. त्यांना मीं लगेच तार पाठविली आहे, कीं त्यांच्यासाठीं नवा जनरेटर इकडून रवाना होत आहे. त्यांना मीं असंहि कळविलं आहे, कीं बॉट्स यांचं डोकं ठिकाणावर नाहीं हें त्यांचं मत मलाहि मान्य आहे. इकडून एक वकील तुमच्याकडे पाठविण्याची विनंति मान्य करतां येत नाहीं. तुम्हीं तिकडचाच एखादा चांगला वकील गाठलात तर त्याचा अधिक उपयोग होईल, असा इथल्या सॉलिसिटरनीं मला सल्ला दिला आहे. त्यांनीं मला असंहि सांगितलं आहे, कीं जो जनरेटर तुम्ही स्वतःच्या मूर्खपणानं घालवून बसलां आहांत त्याची कायदेशीर जबाबदारी तुमच्यावर आहे व तो जनरेटर गेल्यामुळें होणारं नुकसान कंपनीनं सोसण्याचं कांहीं एक कारण नाहीं. गेलेल्या जनरेटरच्या भर किंमतीपैकीं एक डॉलर तुम्हीं वसूल केलेला आहे. उरलेले नऊ हजार नऊशे नव्याण्णव डॉलर कंपनी तुमच्या पगारांतून कापून घेऊन वसूल करील. यावर तुमचं काय म्हणणं आहे तें कळवा. "

दोन दिवसांनीं मिस्टर बॉट्स यांनीं अर्थवर्म ट्रॅक्टर कंपनीचे अध्यक्ष मि. हेंडरसन यांना एक सविस्तर पत्र लिहिलं तें पुढीलप्रमाणें—

" प्रिय मिस्टर हेंडरसन, तुमच्या तारेबद्दल तुमचे आभार मानतों. कारण तुमच्या त्या तारेचा मला फार मोठा उपयोग झाला. तुमची ती तार मिळाल्यामुळं मी क्षणभर अगदीं वैतागून गेलों. पण वैतागल्यामुळेंच कोनवेनं भामटेगिरी करून पळविलेला जनरेटर परत मिळविण्याची अशी

कांहीं नामी युक्ति मला सुचली, कीं तुम्हीं कुचकामाचे चार वकील जरी पाठविले असते तरी त्या सर्वांच्या बापांना मिळून तशी युक्ति सुचली नसती !

काय झालं तें थोडक्यांत सांगतों. तुमची तार वाचल्याबरोबर माझी खात्री झाली, कीं या कामांत वकीलबिकिलांचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं. आपलं आपणच काय तें केलं पाहिजे. एक ट्रॅक्टर घेऊन कार्निव्हलच्या जागीं जायचं आणि जनरेटर ओढून आणायचा, ही माझ्या मनांत अगदीं प्रथम आलेली कल्पनाच मला योग्य वाटूं लागली. मात्र ही कल्पना अंमलांत आणतांना हुशारीनं आणि लबाडीनं वागलं पाहिजे असंहि मीं ठरविलं.

आपले इथले एजंट मिस्टर टायलर यांना मी भेटलों, त्यांच्याशीं पुष्कळ वाद घातला आणि एक उत्तम ड्रायव्हर, सहा निष्णात कामगार, एकशें पंचवीस अश्वशक्तीचा एक अर्थवर्म ट्रॅक्टर, दीड हजार फूट लांब नि एक इंच जाडीची लोखंडी तार आणि एक पिस्तूल इतक्या वस्तू त्यांच्याकडून मिळविल्या व फ्लॉरिडा संस्थानाच्या सरहद्दीकडे निघालों. शहराच्या बाहेर पडल्याबरोबर मुख्य रस्ता सोडला व रानांतून शेतांतून वाट काढीत कॉनबेचा कार्निव्हलचा प्रचंड तंबू ज्या ठिकाणीं होता तिथून नजीक असलेल्या एका शेतांत शिरल्यावर थांबलों.

आतां अंधार पडूं लागला होता. दीड हजार फूट लांबीची तार ट्रॅक्टरच्या मागच्या बाजूस आम्हीं एका दांडीला गच्च आवळून बांधली आणि तार उलगडीत उलगडीत तंबूच्या दिशेनं गेलों. तारेच्या दुसऱ्या टोकाला एक जंगी हूक मीं अडकविला. हा हूक जनरेटरला जोडण्याचा मीं बेत केला होता.

तंबूच्या कॅनव्हसमधल्या भोकांतून मीं पाहिलं तों जनरेटर दोन दिवसांपूर्वीं ज्या ठिकाणीं मीं बघितला त्या ठिकाणींच होता. मीं मनाशीं म्हटलं, ठीक. तंबूच्या खालच्या बाजूनं जमिनीला डबरा पाडून तारेचं हुकाचं टोक मीं आंतल्या बाजूला सरकवून ठेवलं. नंतर माझ्याबरोबर आलेल्या मदतनिसांना मीं म्हटलं, " आतां तुम्ही सगळे परत जा आणि ट्रॅक्टरपाशीं थांबा. मी या कार्निव्हलच्या तंबूंत प्रवेश करणार आहें आणि संधि साधून जनरेटरला तारेचा हूक जोडून टाकणार आहें. हें साधलं कीं मी पिस्तुलचा बार काढीन. बार ऐकल्याबरोबर ट्रॅक्टरच्या ड्रायव्हरनं उत्तरेच्या दिशेनं

ट्रॅक्टर हाकायला सुरवात करायची आणि अर्धापाऊण मैल गेलं कीं थांबायचं. जनरेटर ओढला जाईल आणि फ्लॉरिडाच्या हद्दीबाहेर ज्या ठिकाणीं ट्रॅक्टर आत्तां उभा आहे त्या ठिकाणीं तो येईल. तसा तो आला कीं त्याचं रक्षण करण्याच्या तयारीनं तुम्ही त्याला वेढा घाला. कॉनवेचे गुंड कदाचित् मारामारी करायसाठीं येतील; त्यांना तुम्हीं दाद देतां कामा नये."

माझे मदतनीस निघून गेले; मी तंबूत शिरलों आणि सहज भटकत असल्याचा बहाणा करून जनरेटर ज्या जागीं होता त्या जागेवरून फेऱ्या घातल्या. एक कामगार यंत्राजवळ बसून राहिलेला दिसला. कार्निव्हल चालू असल्यामुळें जिकडे तिकडे विजेच्या दिव्यांचा लखलखाट होता. अशा उजेडांत मला जें काम उरकायचं होतं तें करण्यांत अर्थ नव्हता. म्हणून जनरेटरच्या बाजूला एका कोपऱ्यांत रिकाम्या खोक्यांचा एक ढिगारा होता, त्याच्याआड मी लपून बसलों.

मध्यरात्र उलटल्यावर कार्निव्हल पाहण्यासाठीं येणारीं माणसं हळूहळू परतूं लागलीं. कांहीं माणसं रेंगाळत होतीं, त्यांनाहि घरीं जा म्हणून कॉनवेचे लोक सांगूं लागले. अखेर दीडाच्या सुमाराला सारे प्रेक्षक निघून गेले. जनरेटरवर बसून राहिलेल्या कामगारानं एंजिन बंद केलं. गेले कित्येक तास भिरीभिरी फिरत राहिलेलीं चक्रं आणि पाळणे थांबले. यांत्रिक बँड देखील अखेरची एक ललकारी काढून बंद झाला. दिवे गेले. कार्निव्हलचं सारं आवार अंधारांत बुडून गेलं.

एखाद्या चित्त्यासारखा मी उठलों, खोक्यांच्या अडगळींतून रांगत रांगत बाहेर आलों, चाचपडत पुढें होऊन मघाशीं आंत सरकवून ठेवलेला हूक हातीं घेतला आणि जनरेटरच्या दांड्याच्या एका भोकांत तो अडकवून टाकला.

इतकं झाल्यावर पिस्तुलाचा बार काढावा म्हणून मीं खिशांतून पिस्तूल बाहेर काढलं. पण तितक्यांत पाहिलं तों चहूबाजूंनीं लोक माझ्याकडे दौडत येत होते. 'अरे, दिवे कुणीं बंद केले? पुन्हा लावा!' अशा आरोळ्या ते ठोकीत होते; मी पेंचांत सापडलों.

पण माझ्यांत एक गुण असा आहे, कीं मी पेचांत सांपडलों म्हणजे माझ्या अंगची सारी हुषारी एकदम जागी होते. मीं मनाशीं ठरविलं, कीं

आधीं या लोकांच्या घोळक्यापासून दूर झालं पाहिजे आणि मग बार उडविला पाहिजे; आणि त्याचप्रमाणं जनरेटर एंजिनपासून हालण्यापूर्वी सुरू अगर बंद करणारी चावी यंत्रांतून काढून नेली पाहिजे. मग आस्ते आस्ते मीं पुढें पावलं टाकलीं, जनरेटरच्या जवळ गेलों आणि किल्ली काढून घ्यावी म्हणून पुढं हात केला, परंतु चावी काढून घेण्यासाठीं म्हणून मीं जी फिरविली ती चुकून ‘ सुरू ’च्या बाजूनं फिरली आणि बंद झालेलं एंजिन पुन्हा चालू झालं !

तें पाहून मी एकदम चाटच पडलों. जिथं उभा होतों तिथून आधीं उडी मारली, पण तसं करतांना एका हत्यारांच्या पेटीला पाय लागून मी पडलों. उठणार तों एंजिन जोरानं सुरू झालं होतं. जिकडे तिकडे दिव्यांचा लखलखाट झाला होता आणि पांचपंचवीस लोकांनीं माझ्यावर झडप घातली होती. त्या घोळक्यांत कॉनवेची स्वारी मला तावडतोब दिसली. त्याच्या हातांत पोलादी पत्र्याची कॅश बॉक्स होती. मला पाहतांच तो साळसूदपणानं म्हणाला,

“ अहो ! माझे जुने दोस्त मिस्टर बॉट्सच नव्हे काय ? आतां आपली कोणती चाकरी मी करूं शकतों, सांगाल काय ? ”

मीं चट्कन ओळखलं, कीं परिस्थिति आपल्या अंगावर येत आहे आणि जरा अक्कलहुषारीनं वागलं पाहिजे. कॉनवेच्या रानदांडग्या कामगारांनीं मला असं कांहीं गच्च आवळून धरलं होतं, कीं पिस्तुलाचा बार काढणं अशक्य होतं. माझी एक इंच घेराची लोखंडी तार मीं गवतांत आणि ढेकळांत लपविली होती खरी; पण जनरेटर सुरू झाल्यामुळं जिकडेतिकडे असा कांहीं लख्ख प्रकाश पडला होता, कीं कॉनवेच्या लोकांना ती तार केव्हां दिसेल त्याचा नियम नव्हता. प्रसंग मोठा बांका आला होता. जनरेटर पळविण्याच्या वेळेस कॉनवेनं ज्या तऱ्हेची बडबड करून माझं लक्ष गुंतविलं होतं, त्या तऱ्हेची बडबड या वेळीं केली पाहिजे हें मीं ओळखलं.

मी म्हणालों, “ मिस्टर कॉनवे, समजा, तुमच्या कोणत्याहि जादूच्या प्रयोगापेक्षां अधिक थक्क करून सोडणारा असा एक प्रयोग मीं हस्तगत केला आहे असं जर मीं तुम्हांला सांगितलं, तर तें तुम्हांला खरं वाटेल काय ? समजा, अगदीं तुमच्या डोळ्यांदेखत हा जंगी जनरेटर इथून हालून चालू

लागेल असा चमत्कार केवळ एक मंत्र म्हणून मी करून दाखविणार आहे, असं मीं तुम्हांला सांगितलं, तर त्यावर तुमचा विश्वास बसेल काय ? ”

“ छे, मुळींच बसणार नाहीं ! ” असं म्हणून कॉनवे मोठ्यानं हसूं लागला.

मीं म्हटलं, “ मला जादूचा प्रयोग करतां यावा यासाठीं मला मोकळं सोडाल काय ? कीं आपल्यापेक्षां सवाई जादू करून दाखविणारा माणूस भेटल्यावर त्याला संधीच न देण्याचा भ्याडपणा करणारे भुक्कड जादूगार आहांत तुम्ही ? ”

माझी ही गोळी लागू पडली. कॉनवे आपल्या लोकांना म्हणाला, “ सोडारे, सोडा त्यांना. काय करून दाखवितात तें पाहूं या तरी. ”

मोकळा झाल्यावर मी हत्यारांच्या पेटीवर चढून उभा राहिलों. पाहिलं तों आतां माझ्याभोंवतीं कार्निव्हलमधें कामं करणाऱ्यांची बरीच गर्दी झाली होती. त्यांत तोंडं रंगविलेले पुरुष होते, नाचणाऱ्या पोरीहि होत्या. त्यांच्याकडे पाहून हसून मीं हात हवेंत उंच केला आणि भाषण सुरू केलं—

“ सभ्य स्त्रीपुरुषहो, आतां तुम्हांला असा कांहीं विलक्षण जादूचा प्रयोग पाहावयास मिळणार आहे— ”

कॉनवे मधेंच म्हणाला, “ जरा थोडक्यांत आटपलंत तर बरं होईल... ”

मीं म्हटलं, “ अच्छा. ” मग मीं लहानसंच भाषण केलं आणि नंतर कॉनवेकडून ऐकलेला ‘ ओल्ड बॉंबास्टस ’ वगैरे मंत्र ठणकावून म्हटला. मंत्र संपल्याबरोबर खिशांतून पिस्तूल काढलं, हवेंत उंच धरलं आणि चाप ओढला !

माझ्या प्रयोगांतील हा सर्वांत नाट्यपूर्ण क्षण होता. पिस्तुलाचा ‘ ठो ’ दिशीं बार झाल्याबरोबर तिकडे माझे लोक ट्रॅक्टर चालवूं लागणार होते आणि जनरेटर सरकूं लागणार होता.

परंतु काय आश्चर्य, माझ्या हातांतील पिस्तुलाचा जंगी बार होण्याऐवजीं उगीच एक लहानसा फुसका बार झाला. तो ऐकून मी चांगलाच शरमलों आणि गोंधळलों.

कॉनवे फिदीफिदी हसून म्हणाला, “ मिस्टर बॉट्स, तुम्हीं काय चालवलं आहे मला कळत नाहीं. पण तुम्हांला एक गोष्ट सांगितली पाहिजे

ती ही, कीं तुमच्या खिशांत पिस्तुल आहे ही शंका मला आल्याबरोबर मीं तें तुमच्या नकळत काढून घेऊन त्याच्या जागीं खोटं पिस्तुल ठेवलं होतं. तुम्ही स्वतःला दुखापत करून घ्याल किंवा दुसऱ्याला कराल असं मला वाटलं ! " तो आणखी हंसला.

मी क्षणभर गप्प राहिलों. माझ्या फजितीचं मला भयंकर दुःख झालं होतं. पण मग मीं म्हटलं, " मिस्टर कॉनवे, तुम्हीं जिंकलीत, कबूल. मला वाटतं इथून जनरेटर हालविण्याचा जादूचा प्रयोग मलाच काय, तुम्ही पुन्हा एकवार करायचं म्हटलंत तर तुम्हांला देखील साधायचा नाहीं. तुमची तयारी असेल तर लावा पैज शंभर डालर्सची. तुमच्या मंत्रानं तुम्हीं दहा फूट जनरेटर सरकवून दाखविलात तरी आपण तुम्हांला शंभर डॉलर्स द्यायला तयार आहोंत. करतां काय प्रयोग ? हे पाहा आमचे पैजेचे पैसे. " मीं खिशांतून शंभर डॉलरच्या नोटा काढून दाखविल्या.

कॉनवेनं आपल्या हातांतील कॅश बॉक्स उघडली आणि नोटांचं एक बंडल काढून म्हटलं, " आपण पैज लावायला तयार आहोंत. "

मीं आणि कॉनवेनं आपापले पैसे तिसऱ्या एका माणसाच्या हातीं ठेवण्या-साठीं दिले. कॅशची पेटी तशीच हातांत धरून कॉनवे जरा दूर अंतरावर गेला, एक ट्रक घेऊन आला, त्याच्याशीं जनरेटर एका साखळीनं जोडण्यास त्यानं प्रारंभ केला.

मीं ओरडून म्हटलं, " वा महाराज ! ट्रक वापरतां काय ? ही शुद्ध लबाडी आहे. "

कॉनवे म्हणाला, " लबाडी कशी बुवा ? आपली पैज ठरली, तिच्यांत ट्रक वापरायचा नाहीं असं कांहीं कलम नव्हतं. होतं काय तें पंचांना विचारा वाटल्यास. " असं म्हणून ज्या माणसाच्या हातीं आम्हीं दोघांनीं पैजेचे पैसे ठेवायला दिले होते त्याच्याकडे त्यानं दृष्टि टाकली.

तो कशाला नाहीं म्हणतो आहे ? बोलून चालून तो कॉनवेचाच माणूस ! उंदराला मांजर साक्षी ! पंच बनलेला इसम म्हणाला, " बरोबर आहे, बरोबर आहे. ट्रक वापरतां कामा नये अशी कांहीं अट पैजेंत नव्हती. "

मीं विचार केला, अधिक वादावादी करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. गनिमी काव्यानंच लढलं पाहिजे. ज्या ट्रकला कॉनवेनं जनरेटर जोडला होता तो

छोटासाच होता. मीं आणलेला दांडगा ट्रॅक्टर जर चालू झाला, तर कॉनवेच्या या छोट्या ट्रकसह तो जनरेटर ओढील यांत संशय नव्हता. हा साधा विचार करून मीं म्हटलं,

" हरकत नाहीं. कांहीं हरकत नाहीं. खुशाल जोडा ट्रक जनरेटरला. पण मिस्टर कॉनवे, जादूचा प्रयोग म्हटला कीं तो नीट विधिपूर्वक झाला पाहिजे हे तर तुम्हीं मान्य कराल? जोडला ट्रक जनरेटरला आणि ओढला जनरेटर— यांत जादूच्या प्रयोगाची गंमत कुठून आली? तुम्हीं मंत्र म्हटला पाहिजे, पिस्तुलाचा बार काढला पाहिजे तरच त्याला आपण जादूचा प्रयोग म्हणूं."

" अच्छा अच्छा! तसं का होईना." असं म्हणून कॉनवे हंसत हंसत ट्रकमधें उडी मारून चढला. त्यानं 'ओल्ड बॉंबास्टस' वगैरे आपला ठरलेला मंत्र नेहमींच्या थाटानं म्हटला आणि जें माझं पिस्तूल त्यानं लुंगवलं होतं तें काढून 'ठो'दिशीं उडविलं. पिस्तुलाचा बार अगदीं खणखणून झाला!

कॉनवेनं आपला छोटा ट्रक सुरू केला. पण जनरेटर त्याच्यामागून जाण्याऐवजीं कॉनवेच्या ट्रकसकट तो उलट दिशेनं सरकूं लागला. तें पाहून कॉनवेचे सारे लोक आश्चर्यानं थक्क होऊन जागच्या जागीं उभे राहिले!

नक्की कोणत्या कारणामुळें जनरेटर उलट दिशेनं जाऊं लागला तें कुणाच्या लक्षांत येऊं नये म्हणून त्यांचं लक्ष वेधण्यासारखी बडबड मीं चालू ठेवली; " वाहवा! वाहवा! जगविख्यात जादुगार मिस्टर कॉनवे यांनीं सरळ जनरेटरला साखळी बांधली आहे बघा, जनरेटर उलट दिशेनं जातो आहे. हरकत नाहीं! पण तो जागचा हालला कीं नाहीं? याला म्हणावी जादू! याला म्हणावा मंत्र! मित्रहो, तुम्ही कॉनवेच्या मागोमाग मुळींच जाऊं नका. कॉनवेचा ट्रक दक्षिणेच्या ऐवजीं उत्तरेकडे जातो आहे—हरकत नाहीं. पुन्हा ते या ठिकाणीं येतील. त्यांची वाट बघत तुम्ही सगळे इथंच थांबा, बरं काय! कॉनवेनीं पैज जिंकली आहे, त्यांचे पैसे मी त्यांना देऊन टाकतों."

ज्याच्या हातांत दोनशे डॉलरच्या नोटा होत्या त्या माणसावर मीं झडप घातली आणि नोटा काढून घेतल्या. जनरेटर सरकूं लागल्यामुळं त्याला जोडलेल्या तारा फारच ताणल्या गेल्या आणि अखेरीस तुटल्या. विजेच्या ठिणग्यांचा क्षणभर पाऊस पडला. आणि नंतर जिकडे तिकडे गुडुप अंधार झाला.

कार्निव्हलचा तंबू फाडून जनरेटर बाहेर पडला आणि वेगानं सरकत सरकत कॉनवे ज्या ट्रकमधें उभा होता त्या ट्रकसकट जवळजवळ अर्धा मैल गेल्यावर थांबला. माझे सहा कामगार त्या ठिकाणीं उभेच होते. त्यांनीं ट्रकमधें चढून कॉनवेवर झडप घातली व त्याच्या हातांतील पिस्तूल आधीं काढून घेतलं.

मी म्हणालों, " वाहवा, मिस्टर कॉनवे. तुमची–आमची या वेळीं या ठिकाणीं गांठ पडावी हा मोठा योगायोग म्हणायचा ! " मघापासून माझ्या मनांत एक कल्पना आली होती ती ही, कीं या कॉनवेनं मला ज्याप्रमाणं या जनरेटरला गंडवलं होतं, त्याप्रमाणंच कुणाला तरी गंडवून त्यानं हा छोटा ट्रक देखील मिळविला असला पाहिजे. म्हणून दमदाटी करायचं मीं ठरविलं होतं. मी पुढं म्हणालों, " मिस्टर कॉनवे, तुम्ही आतां जॉर्जिया संस्थानच्या हद्दींत आलां आहांत. तुम्हांला एक बातमी सांगायची आहे. या संस्थानच्या मामलेदारानं तुमच्यावर पकड वॉरंट काढलेलं आहे आणि हा छोटा ट्रक जप्त करण्याचा हुकूमहि काढलेला आहे. हा ट्रक तुम्हीं लबाडीनं लाटलेला आहे. खरं कीं नाहीं, बोला ! "

कॉनवे आतां पुरताच चाट पडला होता. तो ' त त–प प ' करून कांहीं तरी बोलूं लागला.

मीं म्हटलं, " मिस्टर कॉनवे, घाबरूं नका. तुमचा ट्रक तुमच्याकडे राहील अशी व्यवस्था मी करूं शकेन. पण मी म्हणतों त्या साऱ्या गोष्टी तुम्हीं कबूल केल्या पाहिजेत. तुमच्या हातांतली ती कॅश बॉक्स आधीं इकडे द्या पाहूं. ठीक. या पेटींत तुमच्या कार्निव्हलच्या उत्पन्नाचा सारा गल्ला आहे, होय ना ? छान ! "

मीं त्या पेटींतून एक हजार डॉलर काढून घेतले आणि उरलेले सारे पैसे कॉनवेच्या हातीं दिले. ज्या कागदावर कॉनवेनं लबाडीनं माझी सही घेतलेली होती तो विक्रीखताचा टाईप केलेला कागद कॅशबॉक्सच्या तळाशीं मला सापडला. मीं तो काढला आणि फाडून टाकला. नंतर मीं कॉनवेला म्हटलं,

" मिस्टर कॉनवे, तुम्हीं आतांच्या आतां आमच्या कंपनीचा एक जनरेटर विकत घेण्याच्या ऑर्डर फॉर्मवर सही केली पाहिजे. हे हजार

डॉलर तुमच्याकडून आगाऊ जमा झाले आहेत. जनरेटरच्या किंमतीचे उरलेले पैसे तुम्हीं नंतर दिले तरी चालतील. या ऑर्डर फॉर्मवर सही करा बघूं. शाब्बास. हा जनरेटर कंपनीनं मिस्टर हबर्ड यांना दिलेला आहे; पण दुसरा जनरेटर रवाना झालेला आहे. तो आला कीं किंमतीचे उरलेले नऊ हजार डॉलर भरून तो तुम्ही ताब्यांत घेऊं शकतां. कार्निव्हलच्या बागेंतून जनरेटर हलविण्याची पैज मीं जिंकली. तेव्हां हे दोनशे डॉलर माझे झाले. कबूल आहे ना हें सारं ? "

कॉनवे भांडूं लागला ; पण " तुला मामलेदाराच्या स्वाधीन करूं काय ? " असा दम मीं भरला, तेव्हां तो वठणीवर आला. त्यानं पुष्कळच चोऱ्या लबाड्या केल्या असल्या पाहिजेत व त्यामुळं तो मामलेदाराला मनांतून डरत असला पाहिजे. त्यानं माझं सारं म्हणणं कबूल केलं.

त्याच्या धटिंगण कामगारांपैकीं त्याला सोडवायला कुणी आलं नाहीं. तो आमच्या तावडींत पुरता सांपडला होता. लोखंडी तार गुंडाळण्याचं आणि हत्यारं गोळा करण्याचं काम मीं त्याच्याकडूनच करवून घेतलं. शेवटीं आम्ही जनरेटर घेऊन निघालों तेव्हां त्याचा छोटा ट्रक त्याच्या स्वाधीन करून मीं म्हटलं,

" गुड बाय मिस्टर कॉनवे ! जादूचे प्रयोग कसे करावेत ही विद्या मी तुमच्यापासून शिकलों. म्हणून मला तुमचे आभार मानलेच पाहिजेत. तुमच्या धंद्यांतल्या कांहीं युक्त्या मीं शिकाव्या अशी तुमची इच्छा होती ती पूर्ण झाली ना ! तुमचा जादूचा मंत्र मीं आत्मसात् केला म्हणूनच हा जनरेटर मी परत मिळवूं शकलों आणि नऊ हजार नऊशे नव्याण्णव डॉलर्स माझ्या खिशांतून कंपनीला भरण्याची वेळ येणार होती ती टळली. तुमचा मी फार आभारी आहें. गुड बाय. "

अशी ही एकंदर हकीकत घडली. मिस्टर हेंडरसन, आपल्या लक्षांत येईल, कीं माझ्या अकलहुषारीवर मीं हा जनरेटर परत मिळविला आहे. इतकंच नव्हे, तर आणखी एका जनरेटरची ऑर्डर मिळवून तिच्या पोटीं एक हजार डॉलर्स वसूल केले आहेत. वकील पाठवायचं तुम्हीं नाकारलंत म्हणून माझं कांहीं एक बिघडलं नाहीं. किंबहुना माझी आपणास अशी सूचना आहे, कीं आपण यापुढं वकिलांच्या नादीं कधीं लागूंच नये.

कायद्याची पोपटपंची करणाऱ्या या भुक्कडांना कधीं कांहीं विचारायचं नाहीं असं कंपनीनं ठरविलं तर कंपनीचे हजारो डॉलर्स वांचतील. या माझ्या सूचनेवर आपलं काय म्हणणं आहे तें मला कळावं अशी माझी इच्छा आहे.

आपला,

**ॲलेक्झांडर बॉट्स**

( ता. आक्टोबर–१९४९ च्या "सॅटरडे ईव्हिनिंग पोस्ट" मधील विल्यम हॅझलेट अपसन यांच्या "बॉट्स मेक्स मॅजिक" या गोष्टीचा दोन हप्त्यांचा अनुवाद. )

" वेनराइट या वेळेस कुठं गेला कुणास ठाऊक ! " मिसेस मेटन म्हणाली.

हा उद्गार तिनं अगदीं चिंतेच्या स्वरांत काढला होता. परंतु वेनराइट-विषयीं तिच्या मनाला खरोखरच चिंता वाटत होती अशांतला भाग मुळींच नव्हता. तिनं चालविलेल्या खाणावळींत तो राहात होता आणि राहण्याचे च जेवण्याचे ठरलेले पैसे त्यानें वक्तशीर दिले म्हणजे तो कुठें मसणांत गेला तरी तिची हरकत नव्हती. रात्रीच्या जेवणानंतर तिच्या खाणावळींत राहणारी मंडळी बैठकीच्या खोलींत नेहमीं जमत असत, त्याप्रमाणें आज रात्रींहि जमली होतीं व संभाषणाला कांहीं तरी विषय पाहिजे होता. तो विषय पुरवावा एवढ्याच हेतूनं मिसेस् मेटननं उद्गार काढला होता, " वेनराइट या वेळेस कुठं गेला कुणास ठाऊक ! "

मॉटी स्मिथनं विचारलं, " वेनराइट खरंच गेला ? "

वेनराइट गेला असला काय किंवा नसला काय, दोन्ही गोष्टी मॉटी स्मिथला सारख्याच होत्या. पण बैठकींत कांहीं तरी संभाषण निघावं अशी त्याचीहि इच्छा होती आणि मिसेस् मेटननं उपस्थित केलेला प्रश्न थंडावूं नये म्हणून त्यानं मोठ्या उत्सुकतेचा अभिनय करून विचारलं होतं, " वेनराइट खरंच गेला ? "

" पुढच्या दाराचा आवाज मीं ऐकला खरा. " मिसेस मेटन म्हणाली.

" वेनराइट एखादं पत्र टपालांत टाकायला गेला असेल. " मिस् विक्सनं आपला तर्क सांगितला; मात्र तो सांगतांना तिनं कुणाकडेहि पाहिलं नाहीं. दोन्ही हातांतल्या दोन सुया झराझर चालवीत तिनं आपलं विणकाम चालू ठेवलं होतं. आज सत्तर वर्षे झालीं, तिचा हा विणकामाचा उद्योग अखंड चालला होता; आणि आणखी सत्तर वर्षे तो चालणार अशीं चिन्हं दिसत होतीं !

" दाराचा आवाज झाला खरा; पण वेनराइटच गेला कशावरून? दुसरं कुणी गेलं असेल." बेला रेंडॉल म्हणाली. बेला म्हणजे मेटनबाईच्या खाणावळींतली 'सौंदर्यसम्राज्ञी' होती. खेदाची गोष्ट मात्र अशी, कीं खाणावळींत राहणाऱ्या पुरुषांपैकीं एकालाहि तिच्या सौंदर्यानं अजून घायाळ केलं नव्हतं.

बेलाकडे तोंड वळवून म्हातारी मिसेस मेटन म्हणाली, " दुसरं कुणी असेल असं तुला खरंच वाटतं?"

बेला म्हणाली, " होय."

खोलींतल्या सर्व मंडळींनीं अशा अर्थाचे चेहरे केले, कीं 'होय बुवा, ही बेला म्हणते त्याप्रमाणं दुसरं कुणी असेलहि.' मध्यम वयाचा कॅलथ्रॉप खुर्चीत आडवा पसरून इतका वेळ पेंगत होता, त्यानं एकदम डोळे उघडले आणि बाहेर कोण गेलं असावं या प्रश्नाचा गंभीरपणानं विचार करावयास आपणहि तयार आहोंत अशा अर्थाचा चेहरा केला.

थोड्या वेळानं मिसेस मेटन म्हणाली, " मला वाटतं, पेनबेरी बाहेर गेला असेल. त्याचे नेहमीं आंत बाहेर हेलपाटे चालू असतात."

'होय, पेनबेरीच असेल!' असं बेला रेंडॉल म्हणणार होती; पण तितक्यांत पेनबेरीचीच स्वारी एकदम खोलींत प्रविष्ट झाली! आणि त्याला पाहतांच सारी मंडळी स्तब्ध झाली. पेनबेरीचा काय गुण असेल तो असो, पण मंडळींच्या बैठकींत तो आला कीं संभाषण गोठून जात असे खरं. आपण जादा हुषार आहोंत अशी पेनबेरीची स्वतःविषयींची समजूत होती; आणि त्याच्या हुषारीचं कौतुक करण्याची कुणाची तयारी नसल्यामुळं त्याच्या तोंडीं कुणी लागत नसे. आत्तांहि असंच झालं. पेनबेरी आला; बसला. संभाषणावर विरजण पडल्यासारखं झालं. सारींजणं गप्प बसलीं. परंतु तीन मिनिटांच्या वर संभाषणांत खंड पडूं द्यायचा नाहीं असा मिसेस मेटनचा नियम होता. या नियमाप्रमाणें तिनं तीन मिनिटं वाट पाहिली आणि नंतर पेनबेरीकडे वळून विचारलं,

" थोड्या वेळापूर्वीं वेनराइटच पुढचं दार उघडून बाहेर गेला काय?"

पेनबेरीनं चमत्कारिक हास्य केलं आणि विचारलं, " कां? तुम्ही असं कां विचारतां?"

" नाहीं, या वेळेस त्यानं बाहेर जावं याचं आश्चर्य वाटलं म्हणून."

पेनबेरीनं कांहीं उत्तर न करतां फक्त सर्वांकडे नजर टाकली. खोलींतलं वातावरण तंग होऊं लागलं, मिस् विक्सचं विणकाम चालूच होतं. शेवटीं पेनबेरी हलकेच म्हणाला, " अस्सं ! तुम्ही सारींजणंच आश्चर्य करतां आहांत काय ? "

बेला हलकेच पुटपुटली, " आमची कल्पना वेनराइट पत्र टाकायसाठीं बाहेर गेला असावा. "

" ही कल्पना चुकीची आहे. वेनराइट बाहेर गेलेला नाहीं. " पेनबेरी म्हणाला, " वेनराइट मेला आहे ! "

हें ऐकतांच बेलानं ल्हानशी किंकाळी फोडली. मिसेस् मेटनचे डोळे इतके ताणले गेले, कीं तिचीं पांढरीं बुबुळं काचेच्या गोट्यांसारखीं दिसूं लागलीं. मॉटी स्मिथनं आ वासला. कॅलथ्रॉपची पेंग पार उडाली ! मिस् विक्स एकदम चमकली. तिच्या विणकामांत खंड पडला नाहीं; आणि तो कधीं पडणं शक्यच नव्हतं ! स्वतःच्या प्रेतयात्रेच्या वेळीं देखील विणकाम करीत राहण्याची प्रतिज्ञा तिनं केलेली होती...

कॅलथ्रॉप मोठा श्वास टाकून उद्गारला, " वेनराइट मेला ? "

" होय, मेला ! " पेनबेरी म्हणाला, " त्याच्या खोलींत त्याचं प्रेत अस्ताव्यस्त पडलं आहे ! "

मॉटी एकदम उभा राहिला, पुन्हा आपल्या जागीं कोसळून बसला आणि म्हणाला, " अहो, काय सांगतां काय ? "

पेनबेरी म्हणाला, " जें सांगितलें तेंच सांगतों—वेनराइट आपल्या खोलींत मरून पडला आहे. "

मिसेस मेटनच्या खाणावळींतल्या त्या बैठकीच्या खोलींत अगणित वेळां स्तब्धता पसरली असेल; पण या वेळची स्तब्धता भयंकर होती. शेवटीं मिस् विक्सनं त्या असह्य स्तब्धतेचा भंग केला. विणकामांतून मान वर न करतां ती म्हणाली,

" मला वाटतं आपण पोलिसांत वर्दी द्यावी. "

पेनबेरी म्हणाला, " वर्दी दिली गेली आहे. इथें येण्यापूर्वीं मीं पोलीस स्टेशनवर फोन केला आहे. "

" अरे बाप रे ! " कॅलथ्रॉपची झोप आतां पार उडाली.

एखाद्या तोतऱ्या माणसाप्रमाणें अडखळत मॉटीनं विचारलं, "पोलीस इथें येऊन दाखल व्हायला किती वेळ लागेल?"

"फार तर पांच मिनिटं." पेनबेरी म्हणाला, "मला वाटतं, या पांच मिनिटांचा उपयोग आपण करून घेतला पाहिजे. पोलीस आले कीं ते आपणां सर्वांना प्रश्न विचारतील. त्यांना काय सांगायचं तें आपण ठरवून ठेवलेलं बरं."

कॅलथ्रॉप एकदम उसळून म्हणाला, "पण हा गुन्हा कांहीं आपल्यापैकीं कुणीं केलेला नाहीं!"

पेनबेरी म्हणाला, "आपल्या नुसत्या शब्दांवर पोलीस विश्वास ठेवणार नाहींत. म्हणून म्हणतों, आपापले खुलासे आपण तयार करून ठेवूं या. मी कांहीं धंदेवाईक डॉक्टर नाहीं. पण वेनराइटच्या प्रेताची स्थिति मीं पाहिली त्यावरून मला असं वाटतं, कीं तो मेल्याला एक तास झाला असावा—फार तर दीड तास. आत्तां नऊ वाजून गेले आहेत. आठाला वीस मिनिटं कमी असतांना वेनराइट जेवणघरांतून आपल्या खोलीकडे गेला, तें मीं पाहिलं होतं..."

मिस् विक्सनं आपल्या सुया चालू ठेवून विचारलं, "वेनराइट आपल्या खोलीकडे गेला हें कशावरून म्हणतां? तुम्हांला काय माहीत?"

पेनबेरी म्हणाला, "मला माहीत आहे याचं कारण असं, कीं जेवण-घरांतून उठून वेनराइट वर गेला तेव्हां मीहि त्याच्या मागोमाग गेलों. माझं डोकं दुखत होतं. ॲस्पिरिनची बाटली आणावी म्हणून मी आपल्या खोलीकडे गेलों. माझ्या खोलीसमोरच वेनराइटची खोली आहे. तेव्हां तो आपल्या खोलींत गेलेला मला सहजच दिसला. त्यावरून माझा सिद्धान्त असा, कीं आठ वाजून दहा मिनिटं झालीं होतीं तेव्हांपासून आतांपर्यंतच्या काळांत वेनराइटचा खून केव्हां तरी घडलेला आहे. या अवधींत आपल्या-पैकीं जीं माणसं या बैठकीच्या खोलींतून कुठें गेलींच नाहींत, त्यांचा या खुनाशीं कांहीं संबंध नाहीं असं सिद्ध होईल." असं म्हणून त्यानं सर्व मंडळींकडे नजर फिरविली.

सर्वांच्या वतीनं मिस् विक्स म्हणाली, "आपण सगळींच जणं केव्हां ना केव्हां तरी इथून उठून गेलों होतों."

पेनबेरी पुटपुटला, “ ही फार खेदाची गोष्ट म्हणावी लागेल. ”

मॉटी हल्ला करण्याच्या आविर्भावानं पेनबेरीला म्हणाला, “ तुम्हीसुद्धा कांहीं वेळ या खोलींत नव्हतांच कीं ! ”

“ बरोबर आहे, नव्हतों. ” पेनबेरी म्हणाला, “ तेव्हां माझा खुलासा मी प्रथम सांगतों. आठाला वीस मिनिटं कमी असतांना मी वेनराइटच्या पाठोपाठ माडीवर गेलों. आपल्या खोलीकडे जातां जातां वेनराइटनं एक चमत्कारिक विधान केलं. त्या विधानाला आतां फार महत्त्व आलं आहे. तो म्हणाला, ‘ या घरांत एक व्यक्ति अशी आहे कीं जिचा माझ्यावर राग आहे. ’ मीं हंसून त्याला म्हटलं, ‘ एकच आहे ना ? मग माझ्यापेक्षां तुम्ही अधिक भाग्यवान आहांत असं समजा. ’ मग तो आपल्या खोलींत शिरला. त्याला मीं अखेरचं जिवंत पाहिलं तें त्या क्षणीं. मी आपल्या खोलींत गेलों. ॲस्पिरिनच्या दोन गोळ्या खाल्ल्या. वर पाणी प्यावं म्हणून मी मोरींत गेलों. हो, खरंच, मिसेस् मेटन, माझ्या खोलींतला पाण्याचा तांब्या मोलकरीण नेहमीं भरून ठेवीत नाहीं अशी माझी तक्रार आहे बरं का. तें असो. मी आपल्या खोलींतून बाहेर पडलों आणि डोकं अजूनहि उतरेना, म्हणून फिरायला गेलों. सुमारें नऊ वाजस्तवर मी बाहेर होतों. मग मी परत आलो. मिसेस् मेटन, तुम्हांला दार वाजलेलं ऐकूं आलं तें वेनराइट बाहेर गेला म्हणून नव्हे, मी बाहेरून आंत आलों म्हणून. ”

“ हां हां, जरा थांबा हं. ” बेला म्हणाली.

“ कां ? ”

“ मिसेस् मेटनला दार वाजलेलं ऐकूं आलं तें तुम्हांला हो कसं ठाऊक ? तुम्ही तर इथं नव्हतां ! ”

तिच्याकडे टवकारून बघत पेनबेरी पुटपुटला, “ तुझा प्रश्न मोठा हुशारीचा आहे खरा. ”

कॅलथ्रॉप पेनबेरीवर डोळे वटारून म्हणाला, “ बेलाकडे नुसतं पाहात काय राहिलांत ? तिच्या प्रश्नाचं उत्तर काय द्यावं तें ठरवायसाठीं तुम्हांला वेळ पाहिजे आहे वाटतं ? ”

“ मला काय करायची आहे वेळ ? ” पेनबेरी उलट म्हणाला. “ मिसेस मेटनला दार वाजलेलं ऐकूं आलं हें मला माहीत आहे. कारण मी दाराशीं

उभं राहून तुमचीं बोलणीं ऐकत होतों. पण माझा खुलासा माझ्या पद्धतीनं मला सांगू द्याल काय ?... थँक यू . तेव्हां मी काय सांगत होतों, हां. मी परत आलों आणि वर आपल्या खोलीकडे गेलों. तिथें पाहतों तों एक हातरुमाल जमिनीवर पडलेला मला दिसला. तो हातरुमाल माझा नव्हता. मी खोलींतून बाहेर गेलों तेव्हां तो दिसलेलाहि नव्हता. वेनराइट तर माझ्या गैरहजेरींत माझ्या खोलींत आला नसेल आणि त्याचा तर तो हातरुमाल नसेल, अशी शंका माझ्या मनांत आली म्हणून त्याला विचारण्यासाठीं मी त्याच्या खोलींत गेलों. तिथें जाऊन पाहतों तों वेनराइट जमिनीवर मरून पडला होता ! अंगावर सारा पोषाख जसाच्या तसा, डोकं खिडकीच्या बाजूस, एक हात शेकोटीच्या बाजूकडे पसरलेला, अशा स्थितींत तो पडला होता. त्याच्या छातीला जखम लहानशीच होती, पण खोल होती. त्या जखमेमुळं तो ताबडतोब मेला असला पाहिजे. त्याच्या खोलीची खिडकी बंद होती. ज्या व्यक्तीनं खून केला ती व्यक्ति दारांतूनच खोलींत शिरली असली पाहिजे. या साऱ्या गोष्टी मीं पाहून घेतल्या आणि मग वेनराइटच्या खोलीबाहेर आलों. पोलीस आणि डॉक्टर येईपर्यंत साऱ्या गोष्टी जशाच्या तशा राहिल्या पाहिजेत हा विचार माझ्या मनांत आल्यामुळें मीं त्या खोलीचं दार लावून घेतलं आणि कुलूप लावलं. मग मी खालीं आलों आणि टेलिफोन करायसाठीं जेवणघराकडे वळलों. त्या वेळेस या बैठकीच्या खोली-वरून जातांना मला तुमचीं बोलणीं ऐकू आलीं. बाहेरच्या दाराचा आवाज मिसेस् मेटननं ऐकला होता आणि कोण गेलं असावं याबद्दलची चर्चा तुमच्यांत चालली होती. मी जेवणघरांत गेलों, टेलिफोन केला आणि नंतर इथें येऊन तुमच्यांत बसलों. "

घामाघूम झालेल्या मिसेस् मेटननं त्याला प्रश्न केला, " मग इथें आल्या-बरोबर आम्हांला बातमी सांगायच्या ऐवजीं तुम्ही तीन मिनिटं स्वस्थ कां बसलांत ? "

पेनबेरीनं शांतपणं उत्तर दिलं, " तुमचीं तोंडं निरखून पाहायचीं होतीं मला. "

" हं: ! " असा उद्गार काढून कॅलथॉर्प म्हणाला, " महाराज, तुमचा खुलासा कुचकामाचा आहे. तुम्ही बाहेर हिंडायला गेलां होतां कशावरून ? "

पेनबेरी म्हणाला, " सांगतों. मी बाहेर गेलों होतों तेव्हां एका कॉफीच्या दुकानांत शिरून कपभर कॉफी घेतली. हें दुकान इथून एका मैलाच्या अंतरावर आहे. साडेआठ वाजतां मी त्या दुकानांत होतों अशी साक्ष तीं माणसं देतील. झालं? आतां खुलासा करण्याची पाळी कुणाची?"

" माझी!" बेला म्हणाली, " मला नाक शिंकरायचं होतं म्हणून हातरुमाल आणायसाठीं मीं आपल्या खोलींत गेलें होतं. हा पाहिलात हातरुमाल?" हातांतला रुमाल दाखवीत तिनं विजयी मुद्रेनं पेनबेरीकडे पाहिलं.

त्यानं विचारलं, " या बैठकीच्या खोलींत तूं किती वेळ नव्हतीस?"

" पांच सात मिनिटं नसेन."

" नुसता हातरुमाल घेऊन यायला इतका वेळ लागला?"

" मीं कांहीं नुसतं नाक शिंकरलं नाहीं. शिंकरल्यानंतर पावडरसुद्धां लावली."

" ठीक, ठीक." असं म्हणून पेनबेरी कॅलथ्रॉपकडे वळला, " आतां तुमचा खुलासा सांगाल काय? तुम्हांला झोंपेंत चालायची संवय आहे, आम्हांला माहीत आहे. मागच्या आठवड्यांत तुम्ही एकदां माझ्या खोलींत घुसलां होतां, नव्हे काय? तुमचा हातरुमाल हरवला आहे काय?"

डोळे वटारून कॅलथ्रॉप म्हणाला, " म्हणजे तुमचं असं म्हणणं कीं काय—"

त्याच्या गुरगुरण्याकडे लक्ष न देतां पेनबेरीनं इतरांकडे पाहात विचारलं, " गेल्या अर्ध्या तासांत कॅलथ्रॉपला झोप लागली होती का?"

" हो हो, लागली होती बरं!" कॅलथ्रॉप ओरडला. " मूर्खासारखं बोलूं नका. मी झोपेंत चालत गेलों, आणखी कांहीं कारण नसतांना वेनराइटचा खून केला असं सुचवितांना तुम्हांला शरम नाहीं वाटत?" त्यानं आवंढा गिळला आणि राग आवरून शांतपणें म्हटलं, " सुमारें वीस मिनिटांपूर्वीं मी इथून उठून जेवणघरांत गेलों होतों. वर्तमानपत्रांतलं शब्दकोडं मला सोडवायचं होतं. तो अंक मला हवा होता. हा पाहिलात तो अंक?" असं विचारतांना त्यानं हातांतली वर्तमानपत्राची घडी फट्फट् करून दुसऱ्या हातावर आपटली.

खांदे उडवून पेनबेरी म्हणाला, "तुम्ही इतक्या तावातावानं सांगतां आहांत कीं तुमच्याशीं वाद घालण्याची सोय नाहीं. पण तुमच्या हिताची गोष्ट म्हणून सांगून ठेवतों, कीं पोलीस आल्यावर त्यांच्याशीं इतक्या तावातावानं तुम्हीं बोलूं नये हें बरं. हं, मॉटी स्मिथ, आतां तुमची पाळी."

आतांपर्यंत इतरांचीं बोलणीं ऐकतां ऐकतां स्मिथनं आपला खुलासा मनाशीं जुळवून ठेवला होता. इतकंच नव्हे, तर दोन तीन वेळां घोकूनहि ठेवला होता; आणि तावातावानं बोलण्याची जी चूक कॅलथॉपनं केली ती करायची नाहीं असंहि त्यानं मनाशीं ठरविलं होतं. आपण जलद बोल्लों, तर तोतऱ्यासारखं बोलूं हें ओळखून तो अगदीं सावकाशपणानं म्हणाला,

"मी या खोलींतून उठून गेलों त्याचं कारण असं, कीं वेनराइटला* च्यावी परत द्यायला मी विसरलों होतों हें माझ्या लक्षांत आलं. पण वाटेंत मिसेस मेटन भेटली; ती म्हणाली, 'खिडकीचा पडदा नीट बसवायचा आहे, जरा मदत करतां का?' मीं हो म्हटलं आणि तिच्याबरोबर गेलों. पडदा बसवून झाल्यावर मी इकडे परत आलों. मी आणि मिसेस मेटन दोघं मिळून इथें आलों हें सगळ्यांनीं पाहिलेलंच आहे."

मिसेस मेटन मान डोलवून म्हणाली, "बरोबर आहे. मी खिडकीचा पडदा लावायसाठीं गेलें होतें ही गोष्ट स्मिथच्या सांगण्यावरून सिद्ध झालेलीच आहे."

पेनबेरीनं स्मिथकडे रोखून पाहात विचारलं, "वेनराइटची किल्ली तुम्ही परत देणार होतां तिचं पुढं काय झालं?"

"हां सांगतों. खिडकीचा पडदा लावण्याच्या नादांत मी किल्लीची गोष्ट साफ विसरलोंच. ती वेनराइटला न देतांच मी खालीं आलों."

"मग ती अजूनहि तुमच्याजवळ असेल?"

"अलबत्, ही पाहा!"

"अन् तुम्ही वेनराइटच्या खोलींत गेलांच नाहीं?"

"छे. बिलकुल नाहीं! मीं सांगितलं नाहीं तुम्हाला?"

पेनबेरीनं पुन्हा खांदे उडविले. स्मिथच्या हकीकतीनं त्याचं समाधान झालेलं दिसलं नाहीं. पण त्याच्याशीं अधिक बोलण्यांत अर्थ नाहीं असं त्यानं ठरवलं; आणि तो मिस् विक्सकडे वळला. हातांतल्या सुयांची खटपट चालूच ठेवून त्या म्हातारीनं विचारलं,

" माझी पाळी ? "

" आपली हरकत नसेल तर– " पेनबेरी पुटपुटला.

म्हातारी थोडीशी हंसली व म्हणाली, " त्यांत कसली हरकत ? मी इथून उठून आपल्या खोलीकडे गेलें होतें. विणकाम करायसाठीं पोलादाच्या सुया मला आणायच्या होत्या. आतां माझ्या हातांत आहेत त्याच सुया मीं घेतल्या आणि खालीं येऊं लागलें. तोंच वेनराइटच्या खोलींतून खोकण्याचा आवाज आला—— "

पेनबेरीनं मधेंच विचारलं, " काय ? वेनराइटच्या खोकण्याचा आवाज तुम्हीं ऐकला ? त्या वेळेस किती वाजले होते ? "

" मला वाटतं, नऊ वाजण्याचा सुमार होता. " मिस् विक्स म्हणाली, " वेनराइटचं तें खोकणं भारीच चमत्कारिक आहे–आतां ' होतं ' म्हटलं पाहिजे. त्याच्या खोकण्याचा आवाज ऐकला, कीं माझ्या अंगावर काटा उभा राहायचा ! अष्टौप्रहर त्याचं खो खो ऐकूं यायचं. तें ऐकून एखाद्याला वेडच लागायचं! " असं म्हणून ती थांबली. खोलींतलं वातावरण अधिकच तंग झालं.

" पुढें सांगा. " पेनबेरी पुटपुटला.

" सांगतें ना ! " मिस् विक्स म्हणाली, " सांगायला भितें कीं काय ? पेनबेरी, तुमच्या खोलीचं दार उघडं दिसलं म्हणून मी आंत गेलें. मी तुम्हांला म्हणणार होतें, ' कांहीं करा, पण या वेनराइटचं खोकणं थांबवा. ' पण तुम्ही खोलींत नव्हतां. तुम्ही कुठें गेलां होतां तें तुम्हीं सांगितलंच आहे. मी क्षणभर तुमच्या खोलींत थांबलें. पण तितक्यांत समोरच्या खोलींतून वेनराइटचं तें भयंकर खोकणं माझ्या कानांवर पुन्हां आलं–खो खो ॲह ! खः ! खो ! तें ऐकतांच माझी सहनशक्ति अगदीं संपली. मी तुमच्या खोलींतून बाहेर पडलें त्या वेळेस माझा हातरुमाल तिथें पडला असावा, तो तुम्हांला सांपडला. मी वेनराइटच्या खोलीशीं गेलें आणि दाराशीं ठोठावलं. "

एवढं सांगून ती थोडीशी थांबली. पेनबेरी हळूच म्हणाला, " पुढें ? "

त्याबरोबर ती चवताळून ओरडली, " तुम्ही हें पुढें पुढें करायचं बंद करा पाहूं ! "

तिच्या त्या शब्दांनीं सारींचजणं चमकलीं. पेनबेरीनं ओठांवरून जीभ फिरविली. कॅलथॉप खुर्चीतल्या खुर्चींत दुणदिशीं उडाला. स्मिथनं

आपल्या मानेवरून ओघळणाऱ्या घामाच्या धारा पुसल्या. ओठांशीं आलेली किंकाळी बाहेर फुटूं नये म्हणून बेलानं आपले हात एकमेकांत गुंतवून गच्च आवळून धरले. मिसेस् मेटन लाकडाच्या ओंड्यासारखी ताठ बसून राहिली. मिस् विक्स पुन्हा विणूं लागली, तिच्या सुयांचीं टोकं एकमेकांवर घासून कट् कट् असा आवाज होऊं लागला, खोलींतल्या शांततेचा भंग करणारा तेवढाच आवाज होता...

कांहीं वेळानं मिस् विक्स पुढें बोलूं लागली, " वेनराइटच्या खोलीवर मीं थाप मारली, तेव्हां तो आंतून ओरडला, ' या, ' मी उलट ओरडलें, ' आलेंच पाहा. ' मी खोलींत गेलें. माझ्याकडे हंसत पाहून वेनराइटनं विचारलं, ' माझ्या खोकल्याबद्दल तक्रार करायला तुम्ही आलां असाल ? ' मीं म्हटलं, ' नाहीं, तुमचा खोकला कायमचा बंद करायला मी आलें आहें. ' असं म्हणून मी पुढें झालें आणि हातांतली पोलादी सुई मीं त्याच्या छातींत खुपसली—अश्शी ! "

तिनं आपला हडकुळा हात लांब केला आणि खुर्चीवरच्या एका गिर्दीत सुई खस्‌दिशीं खुपसली.

त्याच क्षणीं बाहेरच्या दरवाजावर कुणींतरी थाप मारली !

" पोलीस आले वाटतं ! " कॅलथॉर्प उद्गारला. कुणीहि आपल्या जागेवरून हाललं नाहीं. अगदीं कान टवकारून सारींजणं कानोसा घेऊन ऐकूं लागलीं. खालच्या तळघरांतून मोलकरीण आली व तिनं पुढचं दार उघडलं. कुणीतरी आंत शिरल्यासारखी पावलांची चाहूल ऐकूं आली...

आणि दुसऱ्याच क्षणीं वेनराइटचं खोकणंहि ऐकूं आलं—खोखो ॲहॅ ! खः खो !

मिस् विक्स पेनबेरीकडे पाहून हंसली व म्हणाली, " दहा मिनिटांपूर्वी वेनराइट बाहेर गेला, तेव्हां त्याचं हें खोकणं मीं ऐकलं होतं. पण मिस्टर पेनबेरी, तुम्हीं संभाषणासाठीं कांहीं तरी विषय काढला याबद्दल मी तुमची आभारी आहें. इतरांप्रमाणं मीहि गप्प बसून बसून कंटाळून गेलें होतें. थँक यू ! "

( जे. जेफर्सन फार्यीन यांच्या " वेटिंग फॉर दि पुलीस " या गोष्टीचा अनुवाद. )

## ७ : ॲटम बॉंब !

'कॅव्हॅंडिश' युनिव्हर्सिटीच्या भव्य इमारतींतील सर्वांत मोठा हॉल विद्यार्थिनींनीं चिक्कार भरून गेला होता. व्यासपीठावरील टेबलामागची खुर्ची अजून रिकामी होती. दिवाणखान्यांत दाटीदाटीनं बसलेल्या त्या तरुण विद्यार्थिनी एकीकडे एकमेकीच्या कानाला लागून चिमण्यांसारखा चिवचिवाट करीत होत्या, आणि दुसरीकडे व्यासपीठावरच्या त्या रिकाम्या खुर्चीकडे वरचेवर नजर टाकीत होत्या. अगदीं शिगेला पोचलेल्या उत्कंठेचं वातावरण त्या हॉलमधें या घटकेला भरलेलं होतं. डॉक्टर एड्गर ट्रेमेन यांचं अणुशक्तीवरील अभ्यासक्रमांतलं जें पहिलं व्याख्यान आतां होणार होतं तें व्याख्यान केवळ विद्यार्थिनींमधेंच नव्हे तर एकंदर सबंध युनिव्हर्सिटींत गेल्या कित्येक दिवसांपासून खळबळ उडविणारा चर्चेचा विषय झालं होतं. कारण अणुशक्तीवरील हा अभ्यासक्रम तर अगदीं नव्यानं ठेवलेला होताच, परंतु त्याहूनहि अधिक आश्चर्याचा धक्का देणारी गोष्ट ही होती कीं हा अभ्यासक्रम घेण्यासाठीं 'कॅव्हॅंडिश' युनिव्हर्सिटींत एका पुरुष प्रोफेसराची नेमणूक करण्यांत आली होती !

डॉक्टर एड्गर ट्रेमेन यांनीं ही नेमणूक पत्करतांना भारी खळखळ केली होती. युनिव्हर्सिटीच्या मुख्याध्यापिका मिस् ॲगॅथा डेलाफील्ड यांना डॉक्टर ट्रेमेनची परोपरीनं मनधरणी करावी लागली होती. 'कॅव्हॅंडिश युनिव्हर्सिटी' खास बायकांची युनिव्हर्सिटी होती. या युनिव्हर्सिटींत अध्यापनाचं काम आज कित्येक वर्षं स्त्रियांनींच सांभाळलेलं होतं. पुरुष प्रोफेसराला इथं अध्यापनासाठीं आणण्याच्या कल्पनेचा विटाळ चालकांनीं आपल्या मनाला कधीं होऊं दिला नव्हता. परंतु युनिव्हर्सिटीचा अद्यावत्‌पणा कायम राहावा यासाठीं अणुशक्तीच्या अभ्यासाची सोय करणं जेव्हां आवश्यक झालं आणि हा नवा विषय शिकविण्यासाठीं एकहि लायक स्त्री मिळेना, तेव्हां परंपरेचा वावगा बाऊ न करतां डॉक्टर ट्रेमेन यांना निमंत्रण

देण्याचं चालकांनीं ठरविलं. पण मिस् डेलाफील्ड यांनीं जेव्हां ट्रेमेनची गांठ घेतली तेव्हां ही नेमणूक पत्करण्यास ते कांहीं केल्या तयार होईनात. बायकांच्या महाविद्यालयांत आपण नाहीं शिकविणार, असं ते वरचेवर म्हणूं लागले. " या तुमच्या युनिव्हर्सिटींत चारपांचशे पोरी शिकतात. मी आलों तर साऱ्या युनिव्हर्सिटींत एकटा पुरुष मी असणार. नसत्या भानगडी उत्पन्न व्हायच्या. नकोच तें ! " ते म्हणाले.

मिस् डेलाफील्डनीं त्यांना विचारलं, " भानगडी ? त्या कसल्या ? "

" त्याचं असं आहे, " ट्रेमेन म्हणाले, " मी आतां स्पष्टच बोलतों. मी माझ्या बाजूनं अगदीं घट्ट आहें. शास्त्रीय संशोधनाशिवाय दुसरा कोणताहि विचार माझ्या मनांत येणं शक्यच नाहीं. पण मी आहें तरुण आणि मला वाटतं, देखणाहि. युनिव्हर्सिटींत शिकणाऱ्या मुली असणार अगदीं कोवळ्या वयांतल्या तरण्याताठ्या. त्यांतली एखादी माझ्यावर भाळली म्हणजे माझ्यावर येणार का किटाळ— "

मिस् डेलाफील्ड एकदम म्हणाल्या, " छे छे ! आमच्या युनिव्हर्सिटींतल्या मुली अशांतल्या नाहींत हं ! ! "

" तें नका सांगूं मला. " ट्रेमेन म्हणाले, " तशांतल्या नसल्या तरी मुलीच आहेत ना ? ही तुमची नोकरी नको मला. "

पण मिस् डेलाफील्डनीं अगदीं पिच्छाच पुरविला, तेव्हां ते म्हणाले, " माझी एक अट मान्य करीत असाल तर तुमची ही नोकरी पत्करीन. तुम्ही साऱ्या अध्यापिकांची आणि विद्यार्थिनींची अशी समजूत करून दिली पाहिजे, कीं मी लग्न झालेला संसारी माणूस आहें. मला बायको आहे. एक मूल आहे किंवा दोन मुलं आहेत म्हणाल तर जास्त बरं. मी आतां चांगल्या मिशा वाढवायच्या उद्योगाला लागतों. खोटा चष्मा वापरायची संवय करतों. चांगला मध्य वयाचा संसारी माणूस दिसेन अशा थाटांत येईन. हें तुम्हांला मान्य असेल तर बघा— "

बघा म्हणजे काय ? ट्रेमेनच्या या साऱ्या अटी मान्य करणं भागच होतं डेलाफील्डना. पंचेचाळीस वर्षं, एक बायको आणि दोन मुलंच नव्हे तर साठ वर्षं, दोन घटस्फोट आणि अर्धा डझन मुलं असा घवघवीत संसारी इतिहास ट्रेमेनला चिकटवावा लागला असता तरी त्यांनीं तो आनंदानं

चिकटविला असता. त्यांनीं मोठ्या हर्षभरानं ट्रेमेनचा निरोप घेतला आणि परत येऊन युनिव्हर्सिटीच्या बोर्डावर नोटीस लावली कीं डॉक्टर एड्गर ट्रेमेन, एस्. सी. डी. यांचीं अणुशक्तीवरील व्याख्यानं येत्या सोमवारपासून सुरू होतील. आणि डॉक्टर ट्रेमेन हे मध्य वयाचे संसारी गृहस्थ आहेत व त्यांना दोन मुलं आहेत, अशी बातमी अध्यापिकांत आणि विद्यार्थिनींत पसरेल यासाठीं करावयाची सर्व व्यवस्थाहि त्यांनीं केली. डॉक्टर ट्रेमेन यांच्या व्याख्यानाची नोटीस बोर्डावर लागल्यापासून त्यांच्याबद्दलची भली-बुरी चर्चा अध्यापिका एकमेकींत करूं लागल्या होत्या. मुलींच्या वसति-गृहांत खोल्याखोल्यांतून ही चर्चा रात्रंदिवस अखंड चालू होती. डॉक्टर एड्गर ट्रेमेन या ' पुरुषा ' ला आपण केव्हां एकदां पाहातों असं कॅव्हेंडिश युनिव्हर्सिटीच्या त्या स्त्रीराज्यांतल्या साऱ्या प्रजाजनांना झालं होतं...

हॉलमधें चिक्कार गर्दी करून जमलेल्या चारपांचशे तरण्या पोरींचे डोळे वरचेवर व्यासपीठावरील रिकाम्या खुर्चीकडे वळत होते, त्यामागचा एकंदर इतिहास हा असा होता !

अखेर तासाची घंटा वाजल्याबरोबर चिवचिवाट एकदम बंद झाला. हॉलमधें स्तब्धता पसरली. डॉक्टर ट्रेमेन खुर्चीवर स्थानापन्न झाले. पुरुषाच्या आवाजासाठीं भुकेलेले आपले कान विद्यार्थिनींनीं टवकारले. ट्रेमेन बोलूं लागले,

" सभ्य स्त्रीपुरुषहो ! " अशी त्यांनीं नेहमींच्या सवयीप्रमाणें सुरवात केली. पण ती ऐकतांच विद्यार्थिनींत हास्याची एक लहानशी गोड लाट उठली. त्याबरोबर ते म्हणाले, " सॉरी, सभ्य स्त्रियांनो, असं म्हणायला हवं होतं मीं. आजच्या माझ्या भाषणांत अणुशक्तीच्या मूलभूत स्वरूपाबद्दल विवेचन करण्याचा माझा विचार आहे. मला प्रथम हें सांगितलं पाहिजे, कीं साऱ्या वस्तुमात्रांत एक आंतरिक शक्ति आहे, याची जाणीव आपल्याला असो नसो, पण ही गूढ शक्ति, हें आकर्षण–प्रत्येक वस्तूंत अखंड थरथरत आहे, याबद्दल वाद नाहीं. " हें बोलतांना पुढच्याच बाकावर बसलेल्या हेलन लॅसिटर्न नांवाच्या मुलीची व त्यांची नजरानजर झाली. आपली दृष्टि तिच्या दृष्टींत क्षणभर गुंतली आणि आपल्याकडे पाहून ती किशोरी लाजेनं हंसली, हें ट्रेमेनच्या लक्षांत आलं. त्यांनीं आवाज खाक-रून साफ केला आणि व्याख्यान पुढं चालू केलं, " अंहः ! हंः ! आंतरिक

शक्ति ! या शक्तीचा अभ्यास आपल्याला करायचा आहे. ही शक्ति कधीं जवळ ओढते, कधीं दूर लोटते. परंतु सृष्टींत खळबळ उडविण्याचा तिचा व्यापार सारखा चाललेला आहे. अर्थात् मी जें बोलतों आहे तें जड वस्तूंतील शक्तीसंबंधीं आहे हें लक्षांत ठेवा... "

मागील रांगांत बसलेल्या विद्यार्थिनी या विवेचनाकडे लक्ष देण्याऐवजीं आपसांत निराळीच कुजबुज करीत होत्या. एक दुसरीला विचारीत होती, " काय ग, बरा आहे का हा दिसायला ? " दुसरी उलट विचारीत होती, " तुला आवडला का सांग कीं ! " आणि मग खुद्कन् येणारं हंसूं दाबण्यासाठीं त्या दोघी आपल्या रंगविलेल्या ओठांच्या चंबूवर हातांचे तळवे टेकीत होत्या.

विद्यार्थिनींचे हे ' भूमिगत ' चाळे ट्रेमेनच्या कुठून लक्षांत येणार ? त्यांचं व्याख्यान चालूच होतं. " ...या आंतरिक शक्तीचा स्वभाव मोठा विलक्षण आहे. ती जर का एकदां मोकळी सुटली तर कोणकोणत्या परिणामांची मालिका निष्पन्न होईल तें सांगतां येणार नाहीं... "

मिस् हेलन लॅसिटर्ननं हात उंच दाखवून विचारलं, " सर, मला एक शंका विचारतां येईल का ? "

" अर्थात्– "

" हा विषय अगदीं स्वच्छ कळावा अशी माझी इच्छा आहे म्हणून विचारतें. ज्या गूढ शक्तीचं तुम्ही विवेचन करीत आहांत तिचं स्वरूप स्त्रीपुरुषांत जें परस्पर आकर्षण घडतं त्यासारखंच आहे, असं म्हणतां येईल का ? कारण तें आकर्षण देखील कधीं ओढतं, कधीं दूर लोटतं आणि तें अनावर झालं तर काय काय परिणाम घडवून आणील त्याचा नेम नसतो. "

डॉक्टर ट्रेमेननीं त्या मुलीकडे रोखून पाहिलं. " या दृष्टीनं मीं या विषयाचा कधीं विचार केलेला नाहीं. " ते तुटक आवाजांत म्हणाले, " असले उथळ दाखले विवेचनांत न आणण्याची दक्षता शास्त्रज्ञांनीं घ्यावी लागते. हं ! तेव्हां या अणुशक्तीचे परिणाम... "

बाकांच्या मागील रांगांतली चोरटी चर्चा चालूच होती.

" असा काय दिसतो ग हा ? त्याचा कोट बघ तरी. "

" त्याला म्हणावं ती मिशी तरी काढून टाक किंवा नाकावरचा तो चष्मा तरी टाकून दे. या दोन्ही गोष्टी एकत्र शोभत नाहींत ! "

डॉक्टर ट्रेमेन गंभीर मुद्रेनं सांगत होते, "...ही ओढ कशामुळं निर्माण होते याबद्दल शास्त्रज्ञांचं अजून एकमत नाहीं. ज्या घटकांमध्यें ही ओढ दिसून येते त्यांना जड वस्तूंचे परमाणू समजण्यापेक्षां विद्युत्शक्तीच्या लहरी समजणंच..."

विद्यार्थिनींमधली चोरटी कुजबुज चालूच होती.

" याचं वय किती असेल वाटतं तुला ? "

" सांगणं कठीण आहे. "

" माझा तर्क सांगू तुला ? वीस वर्षांपूर्वी हा एकदम अठरा वर्षांचा जन्मला असला पाहिजे. म्हणजे आज याचं वय अडतिसाच्या घरांत—"

" उं: ! म्हणजे बुढ्ढाच कीं ! याला बायको आणखी दोन पोरं आहेत म्हणतात तें बरोबर आहे. "

फिदीफिदी हंसल्याचे आवाज झाले.

डॉक्टर ट्रेमेन म्हणाले, " सभ्य स्त्रियांनो, माझ्या व्याख्यानाकडे संपूर्ण लक्ष दिलंत तरच हें विवेचन मी पुढं चालू ठेवीन..."

अखेर व्याख्यानाचा तास संपला तेव्हां ट्रेमेननीं सुटकेचा निःश्वास सोडला. व्यासपीठावरून उतरून ते घाईनं निघाले. तितक्यांत एक सुंदर तरुण मुलगी त्यांच्याजवळ आली व म्हणाली, " नमस्ते, मला ओळखलंत ? काल आपली भेट झाली होती. "

" कुठं ? "

" तुम्ही डेलाफील्ड बाईकडे आलां होतां त्या वेळीं. माझं आडनांव वूलरिच. या युनिव्हर्सिटींत मी रसायनशास्त्राची प्रोफेसर आहें, परंतु पदार्थविज्ञानशास्त्राची देखील मला गोडी आहे. आमच्या कुटुंबांतच ही गोडी आहे. म्हणून तुमचीं व्याख्यानं ऐकणार आहें मी. शिवाय शास्त्र-शाखेच्या मुख्याध्यापिकांनीं मला बजावलं आहे कीं तुम्हांला कांहीं मदत लागली तर मीं करावी. तुम्हांला आमच्या प्रयोगशाळेंत कांहीं प्रयोग करायचे असतील तर तुम्हांला हवी ती सारी व्यवस्था करून देण्याची कामगिरी माझ्याकडे सोपविलेली आहे. "

“ थँक यू, मिस वूलरिच. सध्यां कसले प्रयोग करण्याचा माझा बेत नाहीं. आणि तुमच्या मदतीचीहि आवश्यकता नाहीं. तुमची प्रयोगशाळा मात्र बघूं या एकदां. ”

“ चला, दाखवितें. ” असं म्हणून तिनं त्यांना नेलं. तिथं प्रयोगांचीं नानाविध उपकरणं टेबलावर उभीं होतीं, त्यांकडे पाहण्यांत ते मग्न झाले असतांना मिस वूलरिचनं एकदम विचारलं,

“ डॉक्टर, तुम्ही आपल्या बायकोला आणि मुलांना घेऊन या गांवीं आलां आहांत ? ”

“ खरं सांगायचं म्हणजे—” पण ट्रेमेननीं आपली जीभ चावली आणि म्हटलं, “ हं, छे ! नाहीं. ”

“ ही फार खेदाची गोष्ट म्हटली पाहिजे. ” वूलरिच म्हणाली, “ मला वाटलं होतं, तुमच्या बायकोचा आणि मुलांचा परिचय करून घेतां येईल. त्यांना कां नाहीं आणलंत ? ”

“ त्याचं असं आहे, मी कांहीं इथं फार दिवस राहणार नाहीं. सरकारी युनिव्हर्सिटींत मला जागा मिळणार आहे. ती मिळेपर्यंतच काय तो—”

तिनं एकदम भुवया उडविल्या आणि विचारलं, “ सरकारी युनिव्हर्सिटींत ? असं काय ? ”

तिनं तसा प्रश्न कां करावा तें ट्रेमेनना कळलं नाहीं. पण निराळाच विषय काढून त्यांनीं विचारलं, “ त्या मुलीनं मला शंका विचारली ती मनापासून होती कीं केवळ चावटपणा होता ? ”

“ कोणती मुलगी ? ”

“ ती निळ्या डोळ्यांची आणि जाहिरातींतल्या बायकांचे ओठ असतात तशा ओठांची. ”

“ तुम्ही इथल्या मुलींकडे लक्ष देऊं नका डॉक्टर ट्रेमेन. या मुली कशा असतात तें कांहीं मीं तुम्हांला सांगायला नको. तुम्हांला अनुभव आहेच तुमच्या मुलांचा. ”

" माझ्या मुलांचा ? " ट्रेमेननीं एकदम चमकून विचारलं. " पण— हां हां, बरोबर आहे. माझ्या मुलांचा अनुभव मला आहे. पण त्याचं असं आहे, माझीं मुलं फार लहान आहेत—"

" किती वयाचीं ? "

" अं...अं...वयाचीं म्हणतां ? अं...थोरली ईव्हलिन सात वर्षांची आहे, तिच्या खालची एलिसनोर सहा..."

" दोघींत एकच वर्षाचं अंतर ? वा ! छान ! " वूलरिच म्हणाली, " इथं तुमचं मन रमेल अशी मला आशा आहे. तुम्हांला कांहीं लागलं तर मला सांगायला अनमान करूं नका, डॉक्टर ट्रेमेन. "

" तुम्ही मला सारखं डॉक्टर, डॉक्टर काय म्हणतां ? नुसतं ट्रेमेन म्हणा. "

" पण मग तुम्ही देखील मला मिस वूलरिच न म्हणतां नुसतं वूलरिच म्हटलं पाहिजे. "

" अच्छा. नमस्ते वूलरिच. "

" नमस्ते ट्रेमेन—"

नंतरच्या दिवसांत रसायनशास्त्र शिकविणारी वूलरिच आणि ट्रेमेन यांच्या गांठीभेटी प्रसंगाप्रसंगानं वरचेवर झाल्या. आणि मग हलके हलके ट्रेमेन तिचा सहवास मुद्दाम प्रयत्न करून मिळवूं लागले. वर्गांतल्या विद्यार्थिनींशीं अगदीं सक्त ब्रह्मचारी वृत्तीनं वागण्याचा निश्चय आपल्याला सहज पार पाडतां येईल अशा कल्पनेनं अणुशास्त्र शिकविण्यासाठीं आलेल्या ट्रेमेनना ही कुठं कल्पना होती, कीं विद्यार्थिनी वर्ज्य केल्या तरी दुसऱ्या दिशेनं प्रेम आपल्यावर चाल करून येईल ? वूलरिचचा सहवास ट्रेमेनना हवासा वाटूं लागला तेव्हां प्रथम ते मनाशीं आश्चर्य करूं लागले, कीं ज्याला प्रेम, प्रेम म्हणतात त्यानं मला गांठलं ? छे ! असं कसं होईल ? पण मग हलके हलके ते उमजले कीं आपण प्रेमांत सापडलों आहोंत, ही गोष्ट नाकबूल करण्यांत आतां अर्थ नाहीं ! आणि वूलरिचपासून आपलं प्रेम लपविण्यांतहि अर्थ नाहीं ..

एके दिवशीं युनिव्हर्सिटीभोंवतींच्या रम्य उपवनतुल्य परिसरांत हिंडत असतांना तिच्या अंगाचा मधूनच होणारा स्पर्श, आणि तिच्या झुलपांचा सुगंध यांमुळें ट्रेमेनची मनःस्थिति अगदीं अनावर झाली. आपल्या मनांतलं

प्रेम बोलून दाखवावं, वूलरिचचे हात धरावेत, तिला जवळ ओढून घ्यावं, अशा अनेक कल्पना त्यांच्या मनांत येऊं लगल्या; आणि त्यांतली एकहि प्रत्यक्ष अंमलांत आणण्याचं धैर्य त्यांना होईना, तेव्हां ते अगदीं गोंधळून गेले. वूलरिचची गोड बडबड नेहमींप्रमाणेंच चालू होती. तिनं त्यांना मधेंच विचारलं,

" मुलींच्या युनिव्हर्सिटींत शिकविण्याचं काम तुम्हांला प्रथम वाटलं होतं तितकं नकोसं आतां नाहीं ना वाटत ? "

तिच्या गोंडस, मांसल हाताकडे आणि निमुळत्या नाजुक बोटांकडे न्याहाळण्यांत मग्न झालेल्या ट्रेमेनना तिचा तो प्रश्न ऐकूं जाण्यास आणि समजण्यास जरा वेळ लागला. ते दचकून म्हणाले, " आं ? हं...छे छे ! नकोसं नाहीं वाटत आतां. पण त्याचं कारण सांगूं का ? "—पण त्यांचा धीर खचला. अगदीं ओठांशीं आलेले शब्द बाहेर पडले नाहींत. तिचा हात धरण्यासाठीं पुढं सरकणारा त्यांचा हातहि मधेंच थबकला.

खोलीवर परत आल्यावर ते स्वतःला विचारूं लागले, असा हा छळ मी किती दिवस सहन करणार ? त्यांना जेवण गोड लागेना, झोप येईना, बाहेर शुभ्र चांदणं पडलं होतं तें पाहवेना. ते येरझारा घालीत राहिले.

अखेर एके दिवशीं त्यांनीं ठरविलं कीं असल्या भेकडपणांत कांहीं अर्थ नाहीं, प्रेमाचं हें ' थंड युद्ध ' संपवायचं असेल तर धीटपणा केला पाहिजे. आपला सैल गबाळग्रंथी पोषाक त्यांनीं फेकून दिला, मिशी उडवून टाकली, चष्मा टेबलाच्या खणांत ठेवून दिला. अगदीं ऐटबाज कपडे करून ते वर्ग घ्यायसाठीं निघाले. ' अरे, वर्गांतल्या पोरी काय म्हणतील ? ' त्यांच्या मनानं विचारलं. पण ते आपल्या मनाला म्हणाले, ' वर्गांतल्या पोरी करतील चेष्टा तर करूं देत, वूलरिचच्या दृष्टीस तर अशा थाटांत आपण पडूं ? '

पण काय दुर्दैव, त्या दिवशीं वूलरिच त्यांना वर्गांत दिसेना. एकीकडे नजरेनं तिला शोधतां शोधतां त्यांनीं आपल्या व्याख्यानाला सुरवात केली, " शास्त्रीय पद्धतींतील एक गृहीत कृत्य असं आहे... "

मागच्या बाकावरच्या मुलींत चर्चा चालू होती.

" अग, बघ तरी ! काय झोकनोक ! काय थाट ! आपला ॲटम बॉंब अगदीं पार बदलून गेला आहे आज. "

" किती देखणा आहे ग ! त्याला एक बायको अन् दोन पोरं असणं शक्यच नाहीं. आपल्याला बनविलं बघ ! "

" सूर्रर्र ! पोरींनो सांभाळा, जरा जपून ! जरा जपून ! प्रोफेसर-साहेबांच्या फार जवळ जायची आतां सोय नाहीं हो ! "

आजूबाजूच्या साऱ्या मुलींत चक् चक् असे चीत्कार झाले.

ट्रेमेन बोलत होते, " ...परमाणूंत आकर्षण सुरू झालं, कीं तें दाबून ठेवण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्या परमाणूंचं मीलनच झालं पाहिजे. तसं न झाल्यास उष्णता वाढते, तोल सुटतो, अणुशक्ति चिडून खळबळून हालचाल करूं लागते... "

मिस् हेलन लॅसिटर्ननं मधेंच विचारलं, " डॉक्टर, अणूंच्या आकर्षण-शक्तीचा अभ्यास मुलींना झेपण्यासारखा आहे काय ? "

शून्य चित्तानं ट्रेमेननीं उत्तर दिलं, " याचं उत्तर सापेक्ष आहे. "

" तें कशावर अवलंबून आहे सर ? "

" ती मुलगी कशी आहे त्यावर. " असं उत्तर देतांना ट्रेमेनचा ऊर अगदीं भरून आला होता.

व्याख्यान आटपून ते निघाले आणि ल्यूसिल वूलरिच कुठं भेटेल म्हणून शोध करूं लागले. पण सबंध दिवसांत ती त्यांना कुठंहि भेटली नाहीं. अखेर संध्याकाळीं ती त्यांना प्रयोगशाळेंत गवसली. एकटीच !

त्यांना पाहतांच ती म्हणाली, " तुम्ही किती निराळे दिसतां ! तुमच्यांत नक्की कोणता बदल झाला आहे मला सांगतां येत नाहीं; पण तुम्ही अगदीं निराळे दिसतां येवढं खरं. माझ्या या बोलण्याचा राग नाहीं ना यायचा तुम्हांला ? "

" तूं कांहीं बोललीस तरी मला राग येणं शक्य नाहीं. " ट्रेमेन म्हणाले, " सूर्यतापानं पोळलेल्या अंगावर नायगारा धबधब्याच्या पाण्याचे तुषार पडले कीं जो आल्हाद होईल, तो तुझं बोलणं ऐकलं कीं वाटतो. बोल, हवं तें बोल. वूलरिच !—ल्यूसिल !—तुला आश्चर्य वाटेल, पण सांगतोंच—माझी बायको मला सोडून गेली. आज सकाळींच मला तार आली. ती पळून गेली एका व्यापाऱ्याबरोबर. चिक्की विकणाऱ्या व्यापाऱ्याबरोबर. तिचं माझं पटत नव्हतंच. "

'सोडियम क्लोराइड 'च्या एका बरणीशीं हाताचा च
विचारलं, "असं का ? मग आतां तुमच्या मुलांचं कर
"तीं जातील आईबरोबर. मला घटस्फोट मिळेल अ
मोकळा होईन."

"अरेरे ! असं व्हायला नको होतं !"

"छे छे, उलट हें केव्हां घडेल त्याची मी वाट पाहात होतों. ९
तुला कसं सांगूं ?...हें बघ..."

ट्रेमेनच्या शरीरांतील साऱ्या परमाणूंनीं एकदम तोल सोडला आणि
भडकले. ट्रेमेनच्या हातांची मिठी वूलरिचच्या गळ्याभोंवतीं पडली ! तिच्या तोंडाचा मुका घेण्यासाठीं त्यांनीं तोंड पुढं केलं. त्यांचा नेम चुकला. तिच्या डाव्या गालावर त्यांचे ओठ टेकले.

"डॉक्टर ट्रेमेन ?"

"ल्यूसिल, माफ कर !" ट्रेमेन म्हणाले, "तुझं असं चुंबन घेण्यासाठीं फार दिवस वाट पाहात होतों मी. मला लौकरच सरकारी युनिव्हर्सिटींतील जागा मिळणार आहे. मग मला लग्न करायला कांहीं हरकत नाहीं."

"मला खरं खरं सांगतां का ट्रेमेन ?" ल्यूसिलनं विचारलं, "तुमचं वय काय ?"

"सव्वीस–"

"आणि तुम्ही म्हणतां कीं सरकारी युनिव्हर्सिटींतील जागा मिळाली कीं तुम्ही विवाह करणार ?"

"हां, विवाह म्हणजे पुनर्विवाह."

ल्यूसिल एकदम हंसली. तिनं पाठ फिरविली, टेबलावरच्या उपकरणाशीं कांहीं चाळा केला आणि मग एकदम वळून ट्रेमेनच्या नजरेला नजर भिडवून विचारलं, "डॉक्टर ट्रेमेन, डॉक्टर एड्मंड वूलरिच यांना आपण ओळखतां ?"

"नाहीं. ते तुझे कोणी नातेवाईक आहेत कीं काय ?"

"हुं. माझे वडील. सरकारी युनिव्हर्सिटींत ते एका मोठ्या मानाच्या जागेवर आहेत. त्यांना लिहिलेल्या एका पत्रांत मीं तुमचा उल्लेख केला होता. त्यांनीं मला उलट कळविलं कीं त्या सरकारी युनिव्हर्सिटींत तुमची नेमणूक करण्याचा बेत अगदीं निश्चित झाला आहे."

?" मनांतला हर्ष आणि विस्मय ट्रेमेनना लपवितां येईना.
ा तरी–" ल्यूसिल म्हणाली, "मीं त्यांना एका पत्रांत
. लग्न झालेलं आहे आणि तुम्हांला दोन मुली आहेत.
ाडिलांनीं लिहिलं, कीं मग तुम्ही कुणीतरी निराळे असलं
ारण ज्या एड्गर ट्रेमेनची नेमणूक सरकारी युनिव्हर्सिटींत होणार
त अविवाहित आहेत हें नक्की." असं म्हणून ल्यूसिल
ू लागली.

"शाब्बास!" ट्रेमेन म्हणाले. "म्हणजे माझी बायको आणि मुली काल्पनिक आहेत ही गोष्ट तुला पहिल्यापासून माहीत होती तर?"

"अगदीं पहिल्यापासून नाहीं; पण बाबांचं तें पत्र आलं तेव्हां साहजिकच माझी खात्री झाली कीं एक लग्न झालेले आणि दुसरे अविवाहित असे दोन डॉक्टर एड्गर ट्रेमेन सरकारी युनिव्हर्सिटींत नेमले जाणं शक्यच नाहीं. तुम्ही लग्नाचे आहांत याबद्दल मला शंका राहिली नाहीं."

"होय? मग तूं फार कठोर हृदयाची आहेस!"

"कठोर हृदयाची?" ल्यूसिलनं विचारलं, "ती कशी?"

"माझं लग्न झालेलं नाहीं हें तुला माहीत आहे अशी माझी समजूत असती तर एकमेकांबरोबर आपण फिरायला गेलों तेव्हां नुसतं बोलण्यांत वेळ जाऊं दिला नसता मीं. तुला जवळ घेतली असती. आपण एकमेकांचं चुंबन घेतलं असतं."

"पण तुम्ही आपलीं बायकामुलं घेऊन बसलां होतां ना?"

"आतां गेलीं तीं खड्ड्यांत!" असं म्हणून ट्रेमेननीं तिला जवळ ओढली आणि तिचे मुके घेतले.

तितक्यांत त्यांच्या पाठीमागून कुणीसं म्हणालं, "नमस्ते, नमस्ते!" त्या दोघांनीं वळून पाहिलं तों मिस् ॲगथा डेलाफील्ड उभ्या होत्या. त्या हंसत पुढं आल्या व म्हणाल्या, "कसला प्रयोग चालला आहे? रसायनशास्त्र आणि पदार्थशास्त्र या दोन शाखांचं हें सहकार्य पाहून मला फार संतोष होतो. दोघं मिळून कसला प्रयोग करीत आहांत? जुन्या घटकांचं एकीकरण करून एखादा नवा घटक निर्माण करणार असाल! मला माहीत आहे."

" नवा घटक कुठला ? " ल्यूसिल म्हणाली, " ज्या घटकावर आम्हां दोघांचा प्रयोग चालला आहे तो जगाच्या आरंभापासून लोकांना माहीत आहे."

" छान छान ! " डेलाफील्ड म्हणाल्या, " डॉक्टर ट्रेमेन, तुम्हांला या युनिव्हर्सिटींत मीं आग्रहानं आणलं तें चुकीचं ठरलं नाहीं म्हणायचं ! इथल्या कामावर तुम्ही खूप आहांत ना ? "

ट्रेमेन म्हणाले, " एकदम खूष ! "

( लुइ पॉल यांच्या " दि ॲटमिक मेल " या गोष्टीचा संक्षिप्त अनुवाद. )

श्रीधरपंतांच्या बंगल्यापुढें आमची गाडी थांबल्याबरोबर अंगणांत क्रिकेट खेळत असलेल्या मुलांनीं आपला खेळ थांबविला आणि पंतांचे दोघे धाकटे मुलगे फाटकाकडे धांवत येतां येतां ओरडूं लागले, "डॉक्टरकाका आले का? डॉक्टरकाका आले का?" पंत खालीं उतरतां उतरतां म्हणाले, "अरे, घेऊन आलों कीं तुमच्या डॉक्टरकाकांना." तेवढ्यांत ते दोघे कुमार गाडीजवळ येऊन थडकलेच. एकजण हातांतली बॅट गरगर फिरवीत होता, दुसरा चेंडू या हातांतून त्या हातांत आणि त्या हातांतून या हातांत फेंकून झेलण्याचा चाळा करीत होता. मी खालीं उतरलों आणि दोन्ही हातांनीं त्या दोघांचे केस कुस्करीत म्हटलं, "क्रिकेटचं प्रॅक्टिस जोरांत चाललंय का रे?" त्या दोघांपैकीं चेंडूशीं चाळा करणारा धाकटा मुलगा म्हणाला, "नानाच्या लग्नांत पाहुणीं मुलं खूप येणार आहेत, अन् मग आम्ही क्रिकेटची मॅच करणार आहोंत. मी आतां किती फास्ट बोलिंग करतों पाहायचं आहे का तुम्हांला? या, ए सुरेन, ती बॅट दे काकांच्या हातांत. चला काका." तो माझ्या कोटाला धरून ओढूंच लागला. तेव्हां पंत हंसून म्हणाले, "अरे, पण काकांना चहाबिही घेऊं द्याल कीं नाहीं आधीं?" तितक्यांत बंगल्याच्या व्हरांड्यांत पंतांची बायको आणि ज्याचं लग्न ठरलं होतं तो नाना वगैरे मंडळीहि प्रगट झाली आणि "डॉक्टरकाका आले" असा जयघोष त्यांनींहि केला. एक नोकर धांवत आला आणि माझं सामान गाडींतून बाहेर काढून आंत नेऊं लागला. आमची स्वारी पंतांच्या हातांत हात घालून व्हरांड्याकडे निघाली. आजूबाजूस पाहून मीं पंतांना म्हटलं, "अगदीं आमच्या कारवारची आठवण व्हावी अशी आहे ही तुझी नवी जागा." बंगल्याच्या चहूं बाजूंस नारळीच्या उंच उंच झाडांची गर्दी दिसत होती, आणि त्या झाडांच्या फटींतून दूर अंतरावर खाडीचा किनाराहि दिसत होता, त्याकडे अभिमानानें पाहून पंत म्हणाले,

" आहे ना ? मला खात्रीच होती तुला ही आमची नवी जागा आवडेल. मुंबईचं हें नवं उपनगर फार शांत आणि शोभिवंत आहे." मीं म्हटलं, " आहे खरंच."

पायऱ्या चढून मी व्हरांड्यांत गेलों तेव्हां नाना पुढें आला व त्यानं मला नमस्कार केला. अलीकडचीं तरुण मुलं जमिनीपर्यंत वांकून नमस्कार करतील अशी अपेक्षा करण्याची सोयच राहिलेली नाहीं. त्यामुळें नानानं तसा नमस्कार केलेला पाहून मला आश्चर्य वाटलं आणि आनंदहि झाला. " आतां तुला अन् तुझ्या बायकोला एकदमच आशीर्वाद देईन बरं का—" असं हंसत म्हणून मीं त्याच्या खांद्यावर थोपटलं, आणि सहज त्याचा दंड पकडला. त्याचा दंड हाताला लागल्याबरोबर मी चकित झालों. कारण घट्ट कमावलेले स्नायु हाताला लागण्याऐवजीं हाडाची कांब आणि विशविशित मांस माझ्या हाताला लागलं. काय रे ही तुझी तब्येत, असे शब्द माझ्या अगदीं ओठांवर आले पण ते मी बाहेर पडूं दिले नाहींत. तथापि आंत जातां जातां पंतांच्या त्या थोरल्या अन् लाडक्या मुलाकडे मीं पुन्हां नजर टाकली, तेव्हां माझ्या मनांत आलं, अवघ्या बावीस वर्षांच्या या नाजुक पोराचं पंत कशाला लग्न करताहेत ? परंतु माझ्या मनांत लगेच असंही आलं, कीं उत्कृष्ट आरोग्य असल्यावांचून मुलानं किंवा मुलीनं लग्न करूं नये एवढी अक्कल आमच्या देशांतल्या लोकांना यायला अजून पुष्कळ अवकाश आहे, कदाचित् ती कधीं येणारहि नाहीं; आणि शिवाय श्रीमंत आईबापांना आपल्या मुलांचीं लग्नं उरकून टाकण्याची घाई व्हावी ही गोष्ट त्यांच्या श्रीमंतीला शोभण्यासारखीच आहे...

पंतांनीं मला विचारलं, " तूं आधीं वर येऊन कपडे काढणार कीं जेवणघरांत चहा घेणार ? "

" अर्थात् चहा घेणार " असं उत्तर देतां देतां मी व्हरांड्यांतून आंतल्या दालनांत पाऊल टाकलं, पण नानाचा धरलेला दंड माझ्या हातांत अजूनहि होता, त्यामुळें माझ्या मनांतले मघांचे विचारहि चालू होते. या मुलाला नवरी म्हणून जी मुलगी या लोकांनीं पसंत केली आहे तीहि अशीच नाजुक आणि दुबळी असेल काय, असं मी मनाशीं आश्चर्य करीत होतों. माझ्या कारवारच्या पत्त्यावर गेलेली आमंत्रणपत्रिका मला मिळाली असती तर

सौभाग्यकांक्षिणी नवरीचा फोटो मला पाहायला मिळाला असता, पण मीं कारवार सोडल्याला आठ दिवस झाले होते, आणि " नानाचं लग्न ठरविलं आहे. तुला आलंच पाहिजे " इत्यादि मजकुराचं आग्रहाचं पत्र पंतांकडून मी फिरतीवर निघण्यापूर्वीच आलं असल्यामुळें मी लग्नासाठीं प्रत्यक्ष येऊन दाखल झालों होतों, पण लग्नचिठीची आणि माझी चुकामूक झाली होती. नानाची नियोजित वधू मीं अजून फोटोंतसुद्धां पाहिली नव्हती. नानासाठीं पसंत केलेली मुलगी श्रीमंताची आहे व देखणी आहे, ही माहिती पंतांनीं आपल्या पत्रांत मला दिली होती. पण मला या दोन्ही गोष्टींपेक्षां तिसऱ्याच गोष्टीचं महत्त्व अधिक वाटत होतं. नानाची भावी पत्नी चांगली सशक्त आहे, का त्याच्यासारखीच दुबळी आहे, हें जाणण्याची मला अधिक उत्सुकता होती.

४ जेव्हां घरांत पाऊल टाकलं तों त्या दालनाला एखाद्या वेटिंग रूमचं स्वरूप आलेलं मला दिसलं. म्हाताऱ्या आणि तरण्या बायका, पोरंपोरी, तांदळांचे आणि डाळींचे ढीग, वऱ्हाडी बायकांच्या जरीकांठी लुगड्यांच्या घड्या, यांची नुसती खेचाखेच उडाली होती. आंतल्या स्वैंपाकघरांतून नानाप्रकारचे वास येत होते. आणि बायकांचा गलबला कानावर येत होता. धुराची फोडणीहि डोळ्यांना मिळत होती. पंत ओरडून म्हणाले, " आम्ही इथें चहा घेणार आहोंत रे, पळा, " त्याबरोबर लहान मुलं तर चपापलीं आणि सटकलींच, पण बायाबापड्यांची देखील उठून स्वैंपाकघरांत जातां जातां धांदल उडाली. विळीवर बटाटे चिरीत बसलेल्या एका बाईनं खटकन् विळी मिटवून टाकली व बटाट्यांच्या चकत्यांनीं भरलेलं ताट उचलून ती निघाली, तेव्हां एका रांगत्या पोराला तिचा पाय अडखळून सारं ताट जमिनीवर सांडलं. चष्मा लावलेली एक ठेंगणी म्हातारी बिनदातांचं तोंड चर्वणक्रिया केल्याप्रमाणें हालवीत पुढें आली, तेव्हां पंत तिला म्हणाले, " आत्या, हें पाह्यलंस का कोण आलं आहे ? " " कोण रे बाबा ? " असं म्हणत ती पुढें आली. पंत म्हणाले, " अग आपला डॉक्टर ! बाबू ! ओळखलंस ना ? "

म्हातारीनं तोंड माझ्याजवळ आणून माझं निरीक्षण केलं आणि माझ्या अंगावरून हात फिरवीत ती म्हणाली, " किती वर्सांनीं पाहतें आहे तुला.

पण ओळखलं बरं का. बरं झालं तूं आलास. आमच्या पंताचा तूं बालपणचा मैत्र. आतां मुलं किती आहेत तुला ?" पंत खो खो करून हंसले आणि म्हणाले, "अग आत्या, त्यांचं लग्न कुठं झालं आहे ?" आत्या म्हणाली, "हात रांडेच्यांनो !" आणि माझ्याविषयीं फारच वाईट मत झाल्याप्रमाणें पाठ फिरवून ती आंत गेली. तितक्यांत पंतांच्या बायकोनं लाडू, चकल्या, चिरोटे—करंज्यांनीं भरलेल्या प्लेट्स टेबलावर आणून ठेवल्या आणि दुसऱ्या एका चुणचुणीत स्त्रीनं चहाची केटली आणि कपबशाहि आणल्या.

फराळ करतां करतां आणि चहा पितां पितां आजूबाजूच्या कोलाहलाच्या पार्श्वसंगीतावर मारतां येण्यासारख्या होत्या तेवढ्या गप्पा आम्हीं मारल्या. त्यांचा कंटाळा आल्यावर पंतांनीं मला वर नेलं आणि मी कपडे काढून तोंड वगैरे धुऊन कॉटवर स्वस्थ पडलों. पंत चुळबुळ करूं लागल्यावर मीं म्हटलं, "तुम्ही आपल्या कामाला जा पाहूं. माझी सरबराई करण्यांत अडकूं नको. मी कांहीं कुणी परका नाहीं." पंत निघून गेले. ज्या खोलींत माझी प्रतिष्ठापना करण्यांत आली होती त्या खोलीचं मी निरीक्षण करूं लागलों. भिंतीवरच्या चित्रांत गांधी, नेहरू, दोन सिनेमांतल्या नट्या, आणि दोन नामांकित क्रिकेटपटू यांचं संमेलन भरलेलं मला दिसलं. कोपऱ्यांतल्या एका कॅलेंडरवर एप्रिल महिन्याचं पान वाऱ्यानं फडफडत होतं. ही खोली कोणाची असावी याचा नक्की अदमास मला करतां येईना; पण बहुतेक नानाचीच असावी असं मीं ठरविलं. जें वाचीत पडावं असं एखादं पुस्तक कुठें दिसतं काय म्हणून मी पाहूं लागलों. पण कॉटजवळच्या टेबलावर फक्त पानसुपारीचं चांदीचं तबक आणि पत्त्याचीं पानं पडलीं होतीं. पुस्तक वाचण्याऐवजीं स्वस्थ डोळे मिटून पडावं असं मी ठरवीत होतों, इतक्यांत नाना खोलींत आला व म्हणाला,

"काका, तुम्ही स्नान केव्हां करणार ? खालच्या बाथरूममध्यें जाऊं नका तुम्ही. तिथें नुसती झुंबड उडाली आहे. तुमच्यासाठीं वर आणवीन मी पाणी. केव्हां आणवूं सांगा."

मीं म्हटलं, "स्नान सावकाश करीन रे. जेवण किती वाजतां होणार आहे सांग."

तो म्हणाला, " जेवणं काय सारखीं चाललीं आहेत काका, पण खरी पंगत म्हणाल तर एक वाजतां होईल. उशीर होणार. "

" एक म्हणजे उशीर काय ? मी डॉक्टर आहे हें तूं विसरलास वाटतं ! दुपारच्या जेवणाची आमची रोजची वेळ म्हणजे दोन किंवा अडीच. "

नाना म्हणाला, " हो हो. तेंहि खरंच अन् शिवाय तुम्ही आज इथें नाहीं जेवणार, आमच्याबरोबर जेवायला यायचं आहे तुम्हांला. दादांनीं सांगितलं आहे ना तुम्हांला ? "

" नाहीं. पंतांनीं नाहीं सांगितलं. कुणाकडे जेवायला जाणार आहोंत आपण ? "

" रांगणेकरांच्या घरीं. "

" म्हणजे तुझ्या सासुरवाडीला कीं काय ? "

" होय. त्यांनीं आग्रहानं बोलावलंय. "

" असं होय ? ठीक आहे. " तो माझ्या कॉटजवळच्या खुर्चीत बसला तेव्हां मीं एकदम त्याला विचारलं, " अरे नाना, तुझ्या बायकोचा एखादा फोटो आहे का ? असला तर दाखव कीं. बघूं तरी. "

तो किंचित् लाजून हंसत उठला आणि खोलीच्या दुसऱ्या टोकाकडे गेला. तिथल्या टेबलाच्या एका खणांतून एक फोटो काढून तो माझ्याकडे आला आणि फोटो माझ्या हातीं देत म्हणाला, " बघा. " तितक्यांत "नाना! अरे नाना!" अशा त्याच्या आईच्या हांका ऐकूं आल्या. तेव्हां " आलोंच हं " असं मला म्हणून तो धांवत खालीं गेला. मीं तो फोटो डोळ्यांपुढें धरून पाहिला. आणि तो पाहतांच मी इतका आश्चर्यचकित झालों, कीं मी कॉटवर आडवा पडलों होतों, तो उठूनच बसलों. अगदीं डोळे ताणून त्या फोटोकडे मी निरखून पाहात राहिलों. माझ्या डोळ्यांवर माझा विश्वासच बसेना. या मुलीशीं पंतांच्या नानाचं लग्न होणार होतं ? छे ! हें कसं शक्य होतं ?

हुबेहूब अशीच मुलगी मीं अठरा वर्षांपूर्वी पाहिली होती ! हेच डोळे, हेंच नाक, केसांची हीच सुंदर ठेवण, हीच जिवणी, हेंच लावण्य ! एकीला झाकावी आणि दुसरीला दाखवावी ! दोन स्त्रियांमध्यें इतकं तंतोतंत साम्य असूं शकतं असं पूर्वी मला कुणीं सांगितलं असतं तर तें मीं मानलं नसतं. परंतु

त्या विलक्षण साम्याचा प्रत्यक्ष पुरावाच या क्षणीं माझ्या हातांत होता. जिच्याशीं नानाचं लग्न ठरलं होतं तिचा आणि हुबेहूब तिच्यासारखी जी स्त्री मीं अठरा वर्षांपूर्वी पाहिली होती तिचा अर्थाअर्थी कांहीं संबंध असणं शक्य नव्हतं. कारण नानाच्या नियोजित वधूप्रमाणें दिसणाऱ्या ज्या स्त्रीचं बाळंतपण अठरा वर्षांपूर्वी माझ्या हातून झालं होतं ती स्त्री गुजराथी होती! पण संबंध नाहीं म्हणावं तर इतका विलक्षण सारखेपणा तिच्यांत आणि हिच्यांत कसा होता? मायलेकींत देखील असा सारखेपणा सहसा आढळत नाहीं!... एकीकडे हातांतील तो फोटो पहात मी मनाशीं असं आश्चर्य करीत होतों, आणि दुसरीकडे लहान मुलांच्या खेळण्यांतली दुर्बिणीची कागदी नळकांडी हलकेच फिरविली कीं तिच्यांतील रंगीबेरंगी कांचेचे तुकडे सरकून एकमेकांशीं जुळतात त्याप्रमाणें अठरा वर्षांपूर्वीच्या त्या प्रसंगाच्या आठवणीचे दुवे माझ्या मनांत जुळत होते.

त्या वेळीं डॉक्टरीची पदवी मिळवून मी कारवारला नुकताच गेलों होतों. जोन्स नांवाच्या एका अमेरिकन डॉक्टरनं तेथें धर्मार्थ दवाखाना चालविला होता. या जोन्सची कीर्ति मीं फार ऐकली होती, व त्याचा मदतनीस म्हणून काम करण्याची संधि मिळतांच मी दुसरा कसलाहि विचार न करतां कामावर जाऊन रुजू झालों होतों. एका निष्णात सर्जनच्या हाताखालीं मला अनुभव मिळवायचा होता. जोन्सची कीर्ति ऐकून दूरदूरचे रोगी त्याच्याकडे येत! आणि त्यामुळें मी करीन तेवढं काम थोडंच आणि मिळवीन तेवढा अनुभव थोडाच अशी परिस्थिति मला लाभली. या परिस्थितीचा भरपूर फायदा मी घेऊं लागलों, आणि अनुभवाबरोबर जोन्सचं प्रेम आणि विश्वासहि मीं संपादन केला. जोन्स हा मोठा परोपकारी डॉक्टर होता. लोकांची सेवा करण्याची त्याची तळमळ मोठी होती. खेडोपाडीं जाऊन अज्ञानी आणि दरिद्री लोकांना साहाय्य करण्याची त्याची इच्छा त्याला कित्येक वर्षे मनांतल्या मनांत ठेवावी लागली होती. पण त्याच्या दवाखान्याच्या कामांत मी जेव्हां रुळलों तेव्हां कारवारचं हॉस्पिटल माझ्यावर सोपवून तो आठ आठ दहा दहा दिवस खेड्यापाड्यांतल्या फिरतीवर जाऊं लागला. मलाहि उत्तरोत्तर कारवारविषयीं अधिकाधिक प्रेम वाटूं लागलं. कारवारमध्येंच स्थायिक होण्याचे विचार मी करूं लागलों. संध्याकाळीं

फुरसतीच्या वेळेस हॉस्पिटलच्या छोट्याशा बागेंत आरामखुर्चीवर पडून आजूबाजूच्या वनश्रीचं सौंदर्य पाहत आणि दूरच्या किनाऱ्यावर भरतीच्या वेळेस खळाळणाऱ्या लाटांचं संगीत ऐकत स्वतंत्रपणें थाटावयाच्या स्वतःच्या दवाखान्याबद्दलचे मनोरथ करीत मी कितीदां तरी बसे.

एके दिवशीं मी असाच बसलों असतांना फाटकांतून एक गाडी आंत शिरली आणि दोन गुजराथी बायका खालीं उतरल्या. मला पाहतांच त्या माझ्या दिशेनं चालूं लागल्या, तेव्हां मी उठलों आणि चार पावलं सामोरं जाऊन मोडक्या तोडक्या गुजराथींत त्यांना विचारलं, " आपलं काय काम आहे ? "

" हॉस्पिटलवरचे मुख्य डॉक्टर आपणच काय ? " त्या दोघींपैकीं जी वयस्क होती तिच्या तोंडचा हा अगदीं शुद्ध मराठी भाषेंतला प्रश्न ऐकून मला मोठं आश्चर्य वाटलं.

मीं म्हटलं, " मुख्य डॉक्टर मी नाहीं. पण त्यांच्या गैरहजेरींत तुम्ही मलाच मुख्य डॉक्टर समजलांत तरी हरकत नाहीं. " माझा विनोद त्या थोरल्या बाईला कळला आणि आवडला. ती हंसली. तिच्याबरोबरची सुमारें अठरा वर्षांची तरुण स्त्री हंसली कीं नाहीं तें मला कळलं नाहीं; कारण ती जरासं तोंड फिरवून आणि मान खालीं घालून उभी होती. मात्र तरीदेखील तिचं विलक्षण सौंदर्य माझ्या लक्षांत आलं. तिनं मान वर करावी आणि माझ्याकडे पाहून हंसावं या इच्छेनं मीं पुढें म्हटलं, " तुमचा वेष पहावा तर गुजराथी आहे, आणि तुम्ही इतकं शुद्ध मराठी कसं बोलतां ? "

चटकन् हंसणारीं कांहीं माणसं असतात, त्यांपैकीं ती थोरली स्त्री असावी. तिनं हंसून विचारलं, " कां, आम्ही गुजराथी माणसांनीं उत्तम मराठी बोलूं नये कीं काय ? "

" छे छे ! असं कोण म्हणेल ? " असं म्हणून मी हंसलों आणि या वेळेस मात्र माझ्या मनांतील इच्छा पूर्ण झाली. ती तरुण स्त्रीहि चटकन् माझ्याकडे पाहून हंसली. तिचा असामान्य देखणेपणा माझ्या आणखी लक्षांत आला. तिनं माझ्याकडे पाहिलं या गोष्टीचा फायदा घेऊन ती थोरली

स्त्री म्हणाली, " ही माझी लेक मृदुला. माझं नांव सरलाबेन. हिला दाखवायसाठीं मी घेऊन आलें आहे. "

" ठीक ठीक, चला आपण आंत जाऊं. " असं म्हणून मी पुढें झालों व त्या दोघी माझ्यामागोमाग येऊं लागल्या. कायकाम होतं तें मीं ओळखलं होतं. मृदुलाकडे दृष्टि टाकतांच तें लक्षांत येण्यासारखं होतं. तिच्या प्रसूतीची वेळ जवळ आलेली होती. तिला तपासण्यासाठीं तिच्या आईनं तिला आणली असली पाहिजे...मनाशीं मी आश्चर्य करूं लागलों. शुद्ध मराठी बोलणाऱ्या या देखण्या गुजराथी मायलेकी इथें कारवारांत कशा ? त्यांच्या कपड्यालत्त्यांवरून आणि दागिन्यांवरून त्या चांगल्या श्रीमंत असल्या पाहिजेत !...कारवारांत एखादं सधन गुजराथी कुटुंब असल्याचं मीं कांहीं ऐकलं नव्हतं !...मग या काय मुशाफरी करीत कारवारला आल्या होत्या ?

माझ्या या प्रश्नांचीं उत्तरं मला ताबडतोब मिळण्यासारखीं नव्हतीं हें मी जाणून होतों. पण हळूहळू केव्हां तरी तीं मिळतील हेंहि मला माहीत होतं. आणि म्हणून त्या स्त्रियांना वावगं दिसेल असं औत्सुक्य त्यांना दाखवायचं नाहीं असं मीं मनाशीं ठरविलं.

मीं मृदुलाला तपासलं, आणि तीन चार दिवसांत ती प्रसूत होईल असा माझा अंदाज सांगितला. हॉस्पिटलमधली उत्तमांतली उत्तम खोली आम्हांला हवी म्हणून सांगून त्या दोघी गेल्या, आणि तीन दिवसांनीं राहायला आल्या. मृदुलाचं बाळंतपण व्यवस्थित पार पडलं. तिला झालेली मुलगी फार सुंदर होती. बाळंतपणानंतर मायलेकी महिनाभर हॉस्पिटलमध्येंच राहिल्या. त्यांना दिलेली खोली दुसऱ्या कुणाला देण्याची आवश्यकता निर्माण झाली नाहीं. व त्यामुळें त्यांना खोलींत राहूं देणं आम्हांला शक्य झालं. त्यांच्या मुक्कामांत त्या दोघींशीं सावकाशपणानं गप्पा मारण्याची संधि मला पुष्कळदां मिळाली. स्वतःबद्दल अगर स्वतःच्या कौटुंबिक परिस्थितीबद्दल मोकळेपणीं बोलण्यास त्या दोघी फारशा उत्सुक नसत, या गोष्टीचा कधीं कधीं मला अचंबा वाटे, पण एकेका माणसाचा स्वभाव असं समजून मी तो अचंबा मनावेगळा करी. शिवाय स्वतःबद्दल बोलण्याचं टाळणारीं माणसं मला एक प्रकारें आवडतात. त्यामुळें त्या दोघी स्त्रिया मला अधिकच आवडूं लागल्या. मीहि त्यांना त्यांच्या घरच्या गोष्टी मुद्दाम विचारल्याप्रमाणें

कधीं विचारीत नसे. संभाषणाच्या सहज ओघांत त्यांच्याविषयीं जी माहिती मला मिळाली ती मला पुरेशी होती.

सरलाबेनच्या नवऱ्याच्या अळनावर येथें तीन तेलाच्या गिरण्या आणि मोठी इस्टेट होती. काठेवाडांतून आलेलं हें कुटुंब दोन तीन पिढ्या अळनावरला स्थायिक झालं होतं. मृदुलाचं सासर मुंबईस होतं. पण पहिल्या बाळंतपणासाठीं ती माहेरीं आली होती, आणि जोन्सची कीर्ति ऐकून तिची आई तिला घेऊन आमच्या हॉस्पिटलमध्यें आली होती. बाळंतपणानंतर मृदुला दोन अडीच महिने माहेरीं राहणार होती आणि नंतर तिचा नवरा तिला मुंबईस घेऊन जाणार होता. त्या दोघींबद्दलची एवढी माहिती मला पुरेशी होती, आणि यापलीकडे त्यांच्याकडून कांहीं माहिती काढावी असा प्रयत्न करण्याचं मला कांहीं कारण नव्हतं.

मात्र त्यांच्याकडून मिळालेल्या या माहितीबद्दल माझं मन जीमुळं साशंक व्हावं अशी एक गोष्ट माझी इच्छा नसतांना एकदोनदां माझ्या निदर्शनाला आली होती. हॉस्पिटलच्या पत्त्यावर येणाऱ्या साऱ्या पत्रांची वांटणी करण्याचं काम स्टोअर कीपरवर सोपवलेलं होतं. परंतु एखादे वेळेस तो रजेवर असला कीं सारी डाक पाहून एखाद्या नर्सकडून ज्यांचीं पत्रं त्यांच्याकडे पोचविण्याची व्यवस्था मला करावी लागत असे. सरलाबेन जव्हेरी या नांवानं आलेलीं पाकिटं माझ्या हातीं एकदोनदां आलीं आणि नर्सकडे तीं देतांना मीं सहज पाहिलं तों त्यावर अळनावरचा नव्हे तर मुंबईचा शिक्का मला दिसला. या गोष्टीचा चमत्कार वाटल्यामुळें मीं नंतर दोन तीन वेळां मुद्दामच डाक चाळून पाहिली. मृदुलाच्या नांवानं आलेलं पत्र मला डाकेंत कधींच आढळलं नाहीं. आणि तिच्या आईला आलेलं पत्र जेव्हां जेव्हां मीं पाहिलं तेव्हां त्यावर मुंबईच्या पोस्टाचा शिक्का मला स्पष्ट दिसला. अळनावरचा एकदांहि दिसला नाहीं! या गोष्टीचा मला मोठा चमत्कार वाटला. माझ्या मनांतलं आश्चर्य मीं त्या मायलेकींना कधींच दिसूं दिलं नाहीं, पण तें माझ्या मनांत मात्र राहिलं. आणि त्या दोघी हॉस्पिटलचं झालेलं बिल भागवून आणि वर पांचशें रुपयांची देणगी देऊन, आणि डॉक्टर जोन्सचा व माझा निरोप घेऊन गेल्यानंतरहि तें आश्चर्य माझ्या मनांत पुनःपुन्हां येत असे.

यानंतर थोड्याच दिवसांनीं अळनावरचा एक श्रीमान् लिंगायत व्यापारी ॲपेंडिक्सचं ऑपरेशन करून घेण्यासाठीं आमच्या हॉस्पिटलमधें येऊन राहिला, तेव्हां त्याच्याजवळ सरलाबेनच्या नवऱ्याची गोष्ट मी बोललों, आणि त्यांच्या तेलाच्या गिरण्या कशा काय चालल्या आहेत अशी चौकशी केली. तो आश्चर्यानं आ वासून माझ्याकडे पाहातच राहिला. मग मी त्याला सरलाबेन आपल्या मुलीला घेऊन कोणत्या कामासाठीं इथें आली होती आणि महिनाभर कशी राहिली होती याची सगळीच हकीगत सांगितली आणि विचारलं, "अळनावरचं हें श्रीमंत कुटुंब तुम्हांला माहीत नाहीं?" "ओय्यो य्यो!" असा आश्चर्याचा अस्सल कानडी उद्गार काढून तो म्हणाला, "माझी सबंध हयात अळनावरला गेली, तिथला छोट्यांतला छोटा पानपट्टीवाला देखील मला माहीत आहे. तुम्ही सांगतां तो गिरणीवाला व्यापारी अळनावरला खरोखरच असता तर त्याची माहिती मला खात्रीनं झाली असती. पण त्याचं नांव देखील मीं कधीं ऐकलेलं नाहीं." माझ्याकडे पाहत तो क्षणभर गप्प बसला आणि मग म्हणाला, "मुंबईचे कुणी तरी डाकू बायको घेऊन गेले तुम्हांला फसवून डॉक्टरसाहेब!" तो खो खो करून हंसत सुटला. मीं त्याला म्हटलं, "महाराज, जरा बेतानं हंसा. अपेंडिक्सचं ऑपरेशन झालंय तुमचं नुकतंच." खरं म्हणजे मनांतल्या मनांत मला त्याच्या हंसण्याचा राग आला होता. कारण एक बाई आपल्या मुलीला घेऊन आली आणि मला फसवून आपलं काम साधून गेली, अशा अर्थानं तो हंसत होता.

सरलाबेननं सारा खोटा बनाव केला होता, ती अळनावरची नव्हती, मुंबईची होती याविषयीं मला शंका उरली नाहीं. मग मी विचार करूं लागलों, असा खोटा बनाव करण्याचं कारण काय? मुलीचं बाळंतपण म्हणजे कांहीं एखादा अपराध नव्हे. तें उरकण्यासाठीं एवढा खोटा बनाव करण्याचं कारण काय होतं? आणि मुंबईत इतके एकाहून एक असे निष्णात डॉक्टर असतांना मृदुलाला घेऊन इकडे आमच्या कारवारच्या हॉस्पिटलमध्यें सरलाबेन कां आली होती? या प्रश्नाचं एकच उत्तर माझ्या मनाला पटण्यासारखं होतं तें हें, कीं मृदुलाचं लग्न झालं होतं वगैरे साऱ्या गप्पा असल्या पाहिजेत. तिला आलेलं मातृत्व म्हणजे तिच्या

मूर्खपणानं म्हणा अगर एखाद्या पुरुषाच्या डँबिसपणानं म्हणा, तिच्यावर ओढवलेलं संकट असलं पाहिजे. त्या संकटांतून तिला सोडविण्यासाठीं आणि घराची अब्रू वांचविण्यासाठीं इकडे कुग्रामांत येऊन तिचं बाळंतपण उरकून घेण्याची युक्ति तिच्या आईबापांनीं योजिली असली पाहिजे. असंच असलं पाहिजे, याविषयीं जेव्हां माझी खात्री पटली तेव्हां सरलाबेननं मला बनविलं या गोष्टीचा मला विषाद वाटण्याऐवजीं मृदुलाबेनच्या बाळंतपणामागं ज्या खेदकारक आणि नाट्यपूर्ण घटना असल्या पाहिजेत त्या मला कधींच कळण्यासारख्या नाहींत या गोष्टीचा खेद मला अधिक होऊं लागला.

परंतु हा विषाद आणि हा खेदहि मी लवकरच विसरलों. सरलाबेन, तिची मुलगी मृदुला आणि तिच्या पोटीं आलेली सुंदर मुलगी या तिन्हीहि व्यक्तींची माझी आठवण बुजून गेली. आमच्या डॉक्टरीच्या धंद्यांत एकेक अशा व्यक्ती आम्हांला पाहायला सांपडतात आणि असे विलक्षण चमत्कारिक नित्य नवे अनुभव आम्हांला येत असतात, कीं जिचं विस्मरण कधींच होणार नाहीं असं प्रथम वाटतं अशा घटनेवरहि तिच्याहूनहि विस्मयकारक अशा एखाद्या नव्या अनुभवाचा पडदा पडतो आणि मग त्या घटनेच्या आठवणीचा मागमूसहि उरत नाहीं. मृदुलाचं प्रकरण मी केव्हांच विसरून गेलों होतों.

पण आतां नानाच्या नियोजित वधूच्या त्या फोटोकडे पाहतां पाहतां मृदुलाचं तें सारं प्रकरण मला अगदीं काल घडल्याप्रमाणें आठवलं. आणि त्या आठवणीमुळें मी मोठ्या बुचकळ्यांत पडलों. नानाची ही बायको अगदीं हुबेहूब मृदुलासारखी होती! मृदुलाच्या त्या मुलीचं वय आज जितकं असावं तितकंच या मुलीचंहि होतं! पण मृदुलाची मुलगी नानाला सांगून आली असेल हें कसं शक्य होतं? मृदुला गुजराथी कुटुंबांतली होती. नानाच्या बायकोचं आडनांव रांगणेकर असं होतं!...तितक्यांत मला आठवलं, कीं सरलाबेन आणि मृदुला दोघीहि अगदीं उत्कृष्ट मराठी बोलत असत. माझ्याशीं तर त्या दोघी नेहमीं मराठींतच बोलत होत्या. परंतु एक-मेकींत देखील त्यांचं बोलणं गुजराथींत झालेलं मला आठवत नव्हतं! या गोष्टीचा त्या दोघींच्या प्रत्यक्ष सहवासांत मला फारसा चमत्कार वाटला नव्हता. पण नंतर मात्र मृदुलाचं प्रकरण जोंपर्यंत माझ्या मनांत होतं तोंपर्यंत

मनाशीं हें आश्चर्य मी करीत राहिलों होतों...आणि आतां सरलाबेन आणि मृदुला दोघींच्या मराठी बोलण्याची एक नवीनच संगति मला लावतां येत होती, परंतु त्या संगतीचं मला भय वाटत होतं. अविवाहित मातेच्या पोटीं आलेली मुलगी नानाची बायको होणार होती काय? हा विचार मनाला अत्यंत अस्वस्थ करणारा होता!

नाना जेव्हां धांवत जिन्यावरून आला आणि मला कांहीं विचारूं लागला तेव्हां मी चांगलाच दचकलों. माझ्या मनांतल्या विचारांतच मी गुरफटून गेलों होतों. त्यामुळें मला त्याचा प्रश्न नीटसा ऐकूंच आला नाहीं. मीं त्याला म्हटलं, " आं? काय म्हणालास?"

तो म्हणाला, " आई म्हणते तुम्ही पुन्हा गरम गरम चहा घेणार काय?"

मीं उत्तर देण्यापूर्वीं पंताच्या बायकोनं पाठविलेला चहाच वर खोलींत येऊन दाखल झाला, आणि ट्रेमधील कपबशी उचलून नानानं माझ्यापुढें धरली. चहा घेतां घेतां मीं त्याला विचारलं, " आपल्याला किती वाजतां जायचं आहे रे रांगणेकरांकडे?"

तो म्हणाला, " त्यांच्याकडे उशीर होणार नाहीं. साडेअकरा वाजतां जायचं ठरलं आहे. दादा परत आले कीं निघूंच आपण. मला वाटतं तुम्ही आतां स्नान आटपून घ्यावं हें बरं. मी वर पाणी मागवतों हं तुमच्यासाठीं."

तो खालीं गेला तेव्हां मीं घड्याळाकडे पाहिलं. दहा वाजले होते! आणखी दीड तासानं माझ्या मनांत उत्पन्न झालेल्या कोड्याचा उलगडा होणार होता. पण हा मधला अवधि केव्हां संपेल आणि रांगणेकरांच्या घरीं जाऊन त्यांचीं माणसं माझ्या दृष्टीला कधीं पडतील अशी घाई माझ्या मनाला झाली होती. एका गड्याच्या हातीं पाण्याच्या दोन बादल्या देऊन नाना वर आला व म्हणाला, " उठा काका, करतां ना स्नान?" आणि मग त्यानं मला एकदम विचारलं, " तुम्हांला आवडली कीं नाहीं माझी बायको?"

मी हंसलों आणि त्याच्या खांद्यावर थाप देऊन म्हटलं, " अगदीं फर्स्ट क्लास देखणी मुलगी पटकावली आहेस बेट्या. पण मी आपला थोडासा

जुन्या चालीरीतीचा आहे म्हणून विचारतों तीं रांगणेकरांचीं माणसं चांगलीं खानदान आहेत ना ? "

" वा ! म्हणजे काय काका ? " उचलून हातांत घेतलेल्या फोटोकडे पहात तो म्हणाला, " हिचे वडील कस्टम खात्यांत मोठ्या हुद्यावर आहेत. "

" ठीक ठीक ! " असं म्हणून मी स्नानगृहाकडे वळलों.

* * *

पंतांचे व्याही साबाजी रांगणेकर व्हरांड्यांत वर्तमानपत्र वाचीत बसले होते. आमची गाडी पोर्चमध्यें उभी राहिल्याबरोबर ते उठून पुढें झाले, आणि त्यांनीं हास्यमुखानं नमस्कार केला. माझी त्यांची ओळख करून देऊन पंत त्यांना म्हणाले, " नानाच्या लग्नाला हा येईलच अशी माझी खात्री नव्हती. पण तो आज सकाळीं आला अन् आम्ही सारे त्यामुळें खुषींत आहोंत. हा आल्यामुळें तुमची जबाबदारी मात्र वाढली, बरं का ? "

आम्हांला आंत दिवाणखान्यांत घेऊन जातां जातां साबाजीरावांनीं विचारलं, " आमची जबाबदारी वाढली ? ती कशी काय ? "

" जांवयाच्या सख्ख्या चुलत्याप्रमाणें डॉक्टरांचं मानपान तुम्हांला सांभाळावं लागेल. " असं पंत म्हणाले तेव्हां आम्ही सगळींच हंसलों.

साबाजीराव म्हणाले, " हात्तेच्या ! एवढंच ना ? मानपान सांभाळायच्या बाबतींत आम्ही खंबीर आहोंत. तुम्ही अगदीं फिकीर करूं नका. "

साबाजीराव स्वभावानं मोठे आनंदी आणि चतुर बोलण्यांत पटाईत दिसले. जेवायला बसायला थोडा अवकाश होता म्हणून त्यांनीं थंड सरबत आणवलं, व सरबताचे ग्लास आमच्या हातीं देऊन ते म्हणाले, " जांवईबापूंच्या काकांच्या पाया पडायसाठीं बेबीला बोलावतों हं. " आणि ते आंत गेले.

चार पांच मिनिटांच्या आंतच नानाची भावी वधू दिवाणखान्यांत आली आणि तिनं माझ्याजवळ येऊन वांकून नमस्कार केला. ती परत निघाली तेव्हां साबाजीराव तिला म्हणाले, " परत कां निघालीस ? बैस कीं जरा इथेंच. " तिनं पुढें टाकलेलं पाऊल मागें घेतलं, पण ती बसली नाहीं. साडीच्या पदराच्या टोकाशीं चाळा करीत एखाद्या रंगभूमीवरच्या नटीप्रमाणें ती उभी राहिली. तिच्या असामान्य देखणेपणाकडे टक लावून पाहण्याचा

मोह मला आवरेना. अठरा वर्षांपूर्वी मृदुला जेव्हां मला प्रथम दिसली तेव्हां असाच मोह मला पडला होता, त्याची मला आठवण झाली. जेवायला आलेल्या जांवयाबरोबर आणखी एक नवे पाहुणे आल्याची बातमी घरांत पसरली असावी. कारण निरनिराळ्या वयाचीं सात आठ मुलं चोरांसारखीं हळूहळू आंत आलीं आणि माझ्याकडे टक लावून पाहत उभीं राहिलीं. दिवाणखान्याला लागून असलेल्या एका खोलीच्या दाराकडे माझी दृष्टि सहज गेली आणि त्या ठिकाणीं हलकेच येऊन उभ्या राहिलेल्या दोन स्त्रिया पाहतांच मी चमकलों. त्या दोघींचा वेष गुजराथी नव्हता एवढंच, बाकी सरलाबेन आणि मृदुला या दोघी मला अठरा वर्षांनंतर पुन्हां दिसत होत्या! त्या दोघींना पाहतांच मी अत्यंत आश्चर्यचकित झालों. माझं आश्चर्य कोणाला दिसलं कीं काय या शंकेनं मीं पंतांकडे आणि साबाजीरावांकडे पाहिलं. साबाजीरावांनीं माझ्याकडे पाहून किंचित् हास्य केलं, आणि नंतर दारांतून डोकावून पाहणाऱ्या त्या दोन स्त्रियांना उद्देशून ते म्हणाले,

"अरे, जुन्या बायकांसारख्या लाजतां काय? पुढें या कीं!" माझ्याकडे वळून त्यांनीं सांगितलं, "ही बेबी माझी धाकटी मुलगी. ती दारांत उभी आहे ती थोरली मुलगी. तिचे यजमान जेवायला यायचेच आहेत, तेव्हां आपला त्यांचा परिचय होईल. आणि दारांत त्या दुसऱ्या उभ्या आहेत त्या माझ्या पत्नी—या दोघी मुलींच्या आई—म्हणजे या नानासाहेबांच्या सासूबाई!"

अशा प्रकारें एक एक नातं सांगण्यांत आपण मोठा विनोद करीत आहोंत अशा समजुतीनं साबाजीराव मोठ्यांदा हंसले. पंत, नाना आणि बेबी हीं तिघंहि हंसलीं. माझा हंसण्याचा प्रयत्न कितपत यशस्वी झाला कोण जाणे. कारण मी निराळ्याच गोष्टींत गुंतलों होतों. मला पाहतांच दाराशीं डोकावणाऱ्या त्या दोघी स्त्रिया कशा एकदम दचकल्या हें इतर कोणाच्या नव्हे, पण माझ्या ध्यानांत स्पष्टपणें आलं होतं. एखादं संकट अकस्मात् दिसलं, कीं चेहरा बदलावा त्याप्रमाणें त्या मायलेकींच्या चर्या एकदम कशा बदलल्या तें दुसऱ्या कुणाला कळण्यासारखं नव्हतं; पण मला कळलं होतं.

साबाजीराव त्या दोघींना म्हणाले, " अहो, पुढें या ना. असं काय करतां ? " परंतु त्या दोघी पुढें आल्या नाहींत. " पंगतीची तयारी झाली का पाहातें " असं कांहीं तरी पुटपुटून साबाजीरावांची पत्नी वळली व दुसऱ्याच क्षणीं त्या दोघीहि आंत निघून गेल्या. त्या दोघींच्या या वागण्यानं साबाजीराव जरासे शरमिंधे झाले. पण मग सांवरून घेण्यासाठीं बोलल्याप्रमाणें ते म्हणाले, " या बायका कधीं कधीं मोठा जुनेपणा दाखवितात बुवा ! "

मीं त्यांना म्हटलं, " चालायचंच. "

मग त्यांच्या आणि पंतांच्या गप्पा सुरू झाल्या, तेव्हां मी ' टाइम्स 'चा अंक उचलून चाळूं लागलों. ' टाइम्स 'च्या पानावर माझे डोळे होते, पण त्यावरचा मजकूर मी वाचीत नव्हतों. माझ्या मनांत विचारांची गर्दी झाली होती. आत्तांपर्यंत मला जें कोडं वाटलं होतं त्याचा स्पष्ट उलगडा आतां झाला होता. साबाजीराव रांगणेकरांची बायको आणि मुलगी म्हणजे अठरा वर्षांपूर्वीं कारवारला आलेल्या सरलाबेन आणि मृदुलाच होत्या याबद्दल आतां मला शंका उरली नव्हती. आणि नानाची नियोजित वधू साबाजीरावांची मुलगी नव्हे तर त्यांच्या मुलीची मुलगी होती याबद्दलहि माझी खात्री पटली होती. बेबीची थोरली बहीण म्हणून जी जगांत वावरत होती ती तिची खरी आई होती, आणिं तिनं बेबीला जन्म दिला होता त्या वेळेस ती अविवाहित होती, या गोष्टी मला अगदीं स्पष्ट कळून चुकल्या, आणि त्या कळल्यामुळें अठरा वर्षांपूर्वींच्या एका चमत्काराचा खुलासा झाला खरा, पण माझं मन एका नवीनच प्रश्नाच्या चक्रांत सांपडलं. ज्या बेबीच्या जन्माचं रहस्य जगाला माहीत नव्हतं पण मला माहीत होतं, तिच्याशीं माझ्या मित्राच्या मुलाचं लग्न दोन दिवसांत होणार होतं ! तें मीं होऊं द्यावं कीं नाहीं ? माझं कर्तव्य कोणतं होतं ? उलट सुलट विचारांनीं मी इतका अस्वस्थ झालों, कीं नंतर पंक्तीला बसल्यावर पानांतलीं सुग्रास पक्वान्नं मला गोड लागेनात, अथवा हास्यविनोदांत मला भाग घ्यावासाहि वाटेना. मी उगीच नानाच्या लग्नाला आलों असं माझ्या सारखं मनांत येत होतं...

जेवल्यानंतर पान खातां खातां व सिगेरेट ओढतां ओढतां मंडळींच्या आणखी गप्पा झाल्यावर निरोप घेऊन निघण्याच्या बेतानं आम्ही कपडे घालूं लागलों. तितक्यांत साबाजीराव मला हळूंच म्हणाले, " आपली हरकत नसेल तर आपल्याला एक तसदी द्यायची आहे. "

मीं म्हटलं, " काय, सांगा ना. "

" फार दिवस झाले. माझ्या मिसेसना पोटदुखीची व्यथा जडली आहे. पुष्कळ उपचार केले पण कांहीं गुण येत नाहीं. आपण त्यांना तपासाल काय ? मेहेरबानी होईल. "

साबाजीरावांचं तें बोलणं ऐकून मी चांगलाच चमकलों. मिसेस रांगणे-करांना मीं तपासावं ही सूचना म्हणजे केवळ सोंग होतं, खरी गोष्ट म्हणजे त्या मला भेटूं इच्छीत होत्या हें माझ्या ताबडतोब लक्षांत आलं, परंतु या गोष्टीचं जसं मला आश्चर्य वाटलं तसाच मनांत असाहि विचार आला, कीं बघूं या तरी बाई काय म्हणतात तें. कोटांतला स्टेथॉस्कोप मीं काढून घेतला आणि साबाजीरावांबरोबर आंत गेलों.

खोलींत मिसेस रांगणेकर एकट्याच होत्या. साबाजीराव बाहेर उभे राहिले आणि त्यांनीं दार ओढून घेतलं. मिसेस रांगणेकरांनीं माझ्याकडे एकदां नजर टाकली आणि मग एकदम खालीं वांकून त्यांनीं माझे पाय धरले. त्या म्हणाल्या, " डॉक्टरसाहेब, आमची आणि बेबीची अब्रू तुमच्या हातांत आहे. "

आम्हा डॉक्टर लोकांच्या वांट्याला मन गांगरून टाकणारे चमत्कारिक क्षण पुष्कळदां येतात. पण हा क्षण फारच चमत्कारिक होता. मिसेस रांगणेकरांशीं काय बोलावं तें मला कळेना. मीं फक्त त्यांना हलकेच म्हटलं, " माझे पाय कसले धरतां ? "

त्या वाकलेल्या होत्या त्या सरळ उभ्या राहिल्या व म्हणाल्या, " तुमचे पाय धरूं नाहीं तर काय करूं ? बेबी माझीच धाकटी मुलगी आहे असं जगानं मानलं आहे. तिची खरी आई कोण तें तुम्हांला एकट्यालाच माहीत आहे. बेबीचं हें लग्न ठरल्याप्रमाणें होणं किंवा न होणं तुमच्या हातांत आहे. आमची अब्रू, आमचं सुख, बेबीचं सबंध आयुष्य तुमच्या हातांत आहे. "

बोलतां बोलतां त्या रडूं लागल्या, आणि कांहीं वेळानं म्हणाल्या, " डॉक्टरसाहेब, हें लग्न पार पडेल असं मला वचन द्या. तसं वचन तुम्हीं दिलं नाहीं तर अफू खाऊन प्राण देण्यावांचून मला दुसरं गत्यंतर उरणार नाहीं. "

त्यांच्या गालांवरून ओघळणाऱ्या आंसवांकडे मी पहात राहिलों. माझे सारे विचार कुंठित झाले होते. माझं कर्तव्य मला कळेनासं झालं होतं. मी हतबुद्ध होऊन स्वस्थ उभा राहिलों होतों. मिसेस रांगणेकरांचे हुंदके तेवढे मला ऐकूं येत होते. याहि वयांत सुंदर दिसणाऱ्या त्यांच्या शोकाकुल चर्येवरची आर्तता तेवढी मला दिसत होती.

त्या पुन्हां हळू आवाजांत बोलूं लागल्या. अठरा वर्षांपूर्वी एका तरुणानं आपल्या लेकीला कसं फसविलं होतं, तिला संकटमुक्त करण्यासाठीं दूर कारवारला जाण्याचा उपाय कसा करावा लागला होता, व तिला झालेली बेबी आपलीच धाकटी मुलगी म्हणून वाढविण्याचं कपट केल्यामुळेंच सारं संकट टळून आपली लेक आतां कशी सुखानं संसार करीत होती तें त्यांनीं मला सांगितलं. " डॉक्टर, अठरा वर्षांपूर्वी केलेल्या त्या कपटाचं प्रायश्चित्त भोगायला आम्हांला लावूं नका. " त्या म्हणाल्या, " तुम्ही कृपा केली तरच बेबीचं लग्न होईल. मी तुमचे पाय धरतें—"

त्या पुन्हा वाकूं लागल्या तेव्हां मीं म्हटलं, " अं हं. मी तुम्हांला असं करूं देणार नाहीं. " आणि चमत्कार असा, कीं आतांपर्यंत कुंठित झालेले माझे विचार एकदम एखादं बटन दाबल्याप्रमाणें सुरू झाले. माझ्या मनांत आलं, जिचा बाप खरोखरीं अज्ञात आहे अशा मुलीशीं माझ्या मित्राच्या मुलाचं लग्न मीं होऊं देणं म्हणजे त्याचा घात करण्यासारखं आहे खरं, पण उलट विचार केला तर हें लग्न मोडून मी कुणाचा फायदा करणार आहे ? जगाच्या दृष्टीनं बेबी साबाजीराव रांगणेकरांची मुलगी आहे. तिच्या प्रेमांत नाना सांपडला आहे. पंतांनीं तिला पसंत केली आहे. जगाच्या डोळ्यावरचं अज्ञानाचं ढापण कायम राहिलं तर त्यांत कुणाचाच मोठासा घात नाहीं...बेबी खरोखर कुणाची मुलगी असेल ती असो, तिचा बाप कुणीहि असो, ती कांहीं अगदीं भलत्याच कुळांतली नव्हती. तिच्याशीं संसार

केल्यानं नानाचं आयुष्य सुखाचंच होणार होतं...मग मला माहीत असलेल्या रहस्याचा स्फोट करून मी कुणाला सुखी करणार होतों?...

माझ्याच विचारांत मी गुरफटून गेल्यामुळें मी अगदीं गप्प उभा राहिलों होतों. पण माझ्या स्तब्धतेचा अर्थ मिसेस रांगणेकरांना निराळा वाटला असावा. त्यांनीं एकदम माझे हात धरले आणि माझ्या हातांवर मस्तक टेकून त्या म्हणाल्या, "डॉक्टर, मला संशयांत ठेवूं नका. तुम्ही काय करणार आहांत सांगा." असं विचारतां विचारतां त्यांनीं मान उचलून माझ्याकडे पाहिलं.

मीं म्हटलं, "तुमच्या लाडक्या बेबीचा चुलतसासरा मी होणार आहें."

मी हंसलों. माझ्या शब्दांचा अर्थ लक्षांत आल्याबरोबर त्याहि हंसल्या.

"तुमचे आमच्यावर फार उपकार होतील डॉक्टर." असं म्हणून त्यांनीं मोठा सुस्कारा सोडला.

मी खोलीबाहेर आलों, तों साबाजीराव एकटेच तेथें उभे राहिले होते. एखाद्या खुनाच्या खटल्याचा निकाल ऐकण्यासाठीं अधीर झालेल्या माणसाप्रमाणें त्यांनीं माझ्याकडे पाहिलं. मीं त्यांना म्हटलं,

"तुमच्या मिसेसची प्रकृति अगदीं उत्तम आहे. कांहीं काळजी करूं नका."

त्यांची चर्या एकदम फुलली. "डॉक्टर!" असं म्हणून त्यांनीं माझे हात दाबले आणि दुसऱ्याच क्षणीं ते खोलींत आपल्या बायकोकडे गेले.

## ९ : लोक इतके गाढव आहेत.

आगगाडींतून जातां येतां पापडवाडी स्टेशन तुम्हांला पुष्कळदां लागलं असेल. तो पहा पापडे बंधूंचा लोखंडी सामान बनविण्याचा कारखाना, असं म्हणून तुम्ही आपल्या सहप्रवाशांना दुरून दिसणाऱ्या कारखान्याची उंच चिमणी दर वेळेस दाखविलीहि असेल. तुम्ही एखाद्या शाळेंतले मास्तर असाल तर शेंपन्नास विद्यार्थी बरोबर घेऊन कारखाना पाहण्यासाठीं तुम्ही पापडवाडीला एखादे वेळेस भेट देऊन गेलांहि असाल! परंतु पापडवाडीसारख्या कारखान्याच्या गांवाचं अंतरंग कसं असतं, आणि अशा गांवांत क्षुल्लक वाटणाऱ्या गोष्टींतून मोठालीं वादळं कशीं निर्माण होतात तें तुम्हांला आगगाडींतून कारखान्याच्या चिमणीकडे पाहिल्यानं अथवा एका अर्ध्या दिवसापुरती धांवती भेट दिल्यानं कळणार नाहीं. तें समजून घ्यायसाठीं तुम्हीं कांहीं दिवस पापडवाडीला येऊन राहिलं पाहिजे.

असल्या कारखान्याच्या लहानशा गांवांत खेडवळ मूर्खपणा आणि नागरी अतिशहाणपणा यांचं मोठं चमत्कारिक मिश्रण झालेलं असतं. आणि असल्या मिश्रणामुळें कोणत्या लहानशा गोष्टीला मोठ्या चळवळीचं स्वरूप येईल त्याचा नेम नसतो. अलीकडे कामगारांचं युनियन स्थापन झाल्या-पासून हा अनिश्चितपणा फारच वाढला आहे. कुठेंहि खुट्ट वाजलं कीं त्यांत कामगारांच्या हक्कांची पायमल्ली, भांडवलवाल्यांची दडपशाही, इत्यादि मोठमोठ्या उंच आवाजांतल्या घोषणा करण्याची संधि कितपत मिळते एवढंच पाहणारीं कांहीं माणसं खुद्द पापडवाडीस आणि आजूबाजूस आहेत; व त्यामुळें काट्याचा नायटा केव्हां होईल तें सांगतां येत नाहीं. इतर गांवीं घडली तर ज्या गोष्टीकडे कुणी फारसं लक्षहि देणार नाहीं अशा गोष्टीला पापडवाडीस हां हां म्हणतां असं कांहीं प्रक्षोभक स्वरूप येतं, कीं हा प्रश्न नीट गुण्यागोविंदानं सुटला तर ठीक, नाहीं तर कारखान्याची कांहीं धडगत नाहीं असं वाटायला लागतं.

अबदुल पैल्वानाचा उजवा पाय मांडीसकट कापण्यांत आला, ही बातमी कळली तेव्हां मला फार वाईट वाटलं. माझ्या मनांत आलं, आतां बिचारा कारखान्यांतल्या भट्टीपुढें राहून काम कसं करणार? पायच शाबूत नाहीं म्हणजे गेलाच कीं हा कामांतून. आणि कारखान्यांतला रोजगार संभाळून जो दुसरा जोडधंदा अबदुल करीत असे तो तरी त्याच्या हातून आतां कसा होणार? अखिल भारतीय कीर्तीचे बहिरेमुके पहिल्वान मीं पाहिले होते. एखादा नामांकित पहिलवान आंधळा असणंहि शक्य होतं. पण ज्याचा एक पाय अजिबात उतरला गेला होता असा अबदुल आतां पहिल्वानाचा पेशा कसा करणार, आणि फड जिंकून बक्षिसं कशीं मिळविणार? पापड-वाडीच्या लोकांना अबदुलच्या मल्लविद्येंतील पराक्रमांचा मोठा अभिमान होता. एखाद्या फडांत त्याची कुस्ती असली, कीं पापडवाडीचे लोक ती पहायला जायचे, त्यानं कुस्ती जिंकली, कीं त्याची मिरवणूक काढायचे आणि त्याच्या नांवाचा जयघोष करायचे. कश्मीरच्या लोकांना शेख अबदुल्ला यांच्याबद्दल जें वाटत असे तेंच पापडवाडीच्या जनतेला अबदुल शेखबद्दल वाटत होतं, आणि त्यामुळें 'शेरे–कश्मीर'च्या धर्तीवर 'शेरे–पापडवाडी' असा किताब त्यांनीं त्याला दिला होता. कुस्त्यांच्या फडांचीं हँडबिलं छापलीं जात, त्यांत 'अबदुल शेख, शेरे–पापडवाडी' अशी जाहिरात करण्याचं कंत्राटदारानं कबूल केल्याखेरीज आतांशा अबदुल कोण-त्याहि कुस्तीची सुपारी घेत नसे... आणि असा हा पापडवाडीचा 'शेर' आतां उजवा पाय गमावून मिरजेच्या हॉस्पिटलमध्यें एका कॉटवर पडला होता!... ही बातमी ऐकून मला खरोखर फार दुःख झालं. मीं मनाशीं म्हटलं, सुट्टीच्या दिवशीं अबदुलच्या समाचारासाठीं मिरजेला जाऊन यायला हवं.

त्याप्रमाणें मी जाऊन आलों. अबदुलचा पाय गेला होता पण बाकी त्याची तब्येत उत्तम होती. तो माझ्याशीं हंसत खेळत बोलला. अकल्पित कोसळलेल्या पांगळेपणाच्या संकटाला धैर्यानं तोंड देण्याची त्याच्या मनाची तयारी झालेली दिसली. मीं त्याला विचारलं, "आतां पापडवाडीस केव्हां येणार?"

तो म्हणाला, "आतां तिकडे येऊन काय करूं? मी असा निकामी झालों. आतां मी कारखान्यांत कशाला येऊं? मी माझ्या गांवीं जाईन. थोडीशी शेती आहे, जोडीला कोंबड्या बाळगायचं ठरवलंय..."

त्याच्या त्या शब्दांत धैर्य होतं, परंतु त्याप्रमाणेंच प्रयत्नानं लपविलेलं दुःखहि होतं. कुस्तीचे फड जिंकणाऱ्या या तरण्याताठ्या जवानाचं उरलेलं आयुष्य अंड्याकोंबड्यांची पैदास करण्यांत जाणार, या कल्पनेनं मला एकदम गहिंवर आला. त्याचा निरोप घेतांना मीं मुद्दाम हंसून म्हटलं, "तुझा धंदा सुरू झाला, कीं अंडीं विकत घ्यायसाठीं मुद्दाम येईन मी तुझ्या गांवीं."

त्यानं माझा हात दाबून हास्य केलं, आणि म्हटलं, "या या, खरंच या हं. इथून डिस्चार्ज मिळाला, कीं मी आपल्या गांवीं जाणार. मी गेल्याचं तुम्हांला कळेलच."

परंतु अबदुल डिस्चार्ज घेऊन आपल्या गांवीं गेल्याचं समजण्याऐवजीं एके दिवशीं पाहतों तों पापडवाडीसच तो आला. किंवा तो आला असं म्हणण्याऐवजीं कांहीं लोकांनीं स्वतःच्या मतलबासाठीं त्याला आणलं असं म्हटलं पाहिजे. कारण तो पापडवाडीस परत आल्याचं आश्चर्य वाटून मी जेव्हां त्याबद्दल जरा खोलांत चौकशी केली तेव्हां मला एकेक चमत्कार कळायला लागला.

तात्या कुलकर्णी आणि संभू धायगुडे हे दोघे आमच्या पापडवाडीचे धंदेवाईक कार्यकर्ते होते. समाजाला झोंपी जाऊं न देणं, त्याला सारखं जागं ठेवणं, कोणत्या ना कोणत्या प्रश्नावर लोकांची नेहमीं उठावणी करणं हा पवित्र धंदा ते मोठ्या कसोशीनं करीत असत. मालक आणि कामगार यांच्यांत कोणत्या ना कोणत्या तरी निमित्तानं सतत झगडा चालू रहावा यासाठीं ते धनानं नव्हे पण तनमनें करून झटत असत. बेचाळीस सालच्या जातपाती चळवळींत या दोघांनीं चांगली क़माई करून ठेवली होती असं लोक म्हणत. खरं खोटं त्यांचं त्यांना माहीत. पण त्या काळांत क्रांतिवीर ठरलेले हे दोघे पुरुष स्वतःकडचा पुढारीपणा टिकविण्यासाठीं कारखान्यांतल्या कामगारांची उठावणी ज्यायोगें करतां येईल अशा निमित्ताच्या शोधांत सदैव असत एवढं खरं. अबदुल शेखच्या तुटलेल्या पायावर एका नवीन

लढ्याची उभारणी करतां येईल असं त्यांना वाटलं. ते मिरजेस गेले आणि अबदुल्ला म्हणाले,

" आपल्या गांवीं कसला जातोस वेड्यासारखा ? पापडवाडीला चल."

त्यानं विचारलं, " वाडीला येऊन काय करूं ? "

" त्याची फिकीर तुला नको. जें करायचं तें तुझ्या कल्याणासाठींच आम्ही करूं एवढा विश्वास नाहीं कां तुला ? मुकाट्यानं चल आमच्या-बरोबर. " असं म्हणून त्यांनीं त्याला मोटारींत घातलं, पापडवाडीला आणलं आणि स्टेशनापासून गांवापर्यंत त्याची छोटीशी मिरवणूकच काढली. ' कामगार लढ्याचा विजय असो ! ' या ठरीव घोषणेचा उच्चार तर या मिरवणुकींत होतच होता, पण शिवाय या प्रसंगासाठीं स्पेशल घोषणा तयार करण्यांत आल्या होत्या. ' शेरे–पापडवाडीवरचा अन्याय दूर झाला पाहिजे !' ' कामगारांनो, उठा ! शेरे–पापडवाडीचा प्रश्न धसास लावा. '

अबदुलचा पाय कापला गेला यांत धसास लावण्यासारखा कोणता प्रश्न होता, अबदुलवर कुणी कसला अन्याय केला होता, आणि तो दूर करायचा म्हणजे काय करायचं होतं हें आमच्या लक्षांत येईना. त्या घोषणा मोठ-मोठ्यांदा करणाऱ्या कामगारांच्या तरी तें लक्षांत आलं असेल कीं नाहीं कोण जाणे ! पण ते उंच आवाजांत ओरडत होते खरे. दोघादोघांच्या रांगानीं साठ सत्तर कामगार आणि पांच पंचवीस पोरं चाललीं होतीं. हातोड्या-कोयत्यांचीं मळकट तांबडीं निशाणं फडकत होतीं. ' शेरे–पापडवाडीच्या पायाची आठवण ठेवा ' अशा मोठमोठ्या वांकड्या तिकड्या अक्षरांचीं दोन बांबूंना लावलेली कापडाची पट्टी दोघांनीं हातांत धरली होती, आणि तिच्या-मागं एका उघड्या मोटारींत गळ्यांत हार घातलेल्या अबदुल शेखला बसवून तिच्या दोन्हीं अंगांनीं तात्या कुलकर्णी आणि संभू धायगुडे या दोन क्रांति-वीर पुढाऱ्यांच्या स्वाऱ्या खादी टोपी, खादी शर्ट, चौकटीचं गरम नेहरू जाकीट अशा पोषाखांत जातीनं डुलत डुलत चालल्या होत्या !

त्या मिरवणुकीचा अर्थच आम्हांला कळेना. परंतु अबदुल शेखचा कापलेला पाय म्हणजे कारखान्यांतल्या कामगारांच्या नव्या उठावाचं निमित्त ठरणार असं लक्षण मात्र त्या मिरवणुकीवरून आम्हांला दिसलं. आणि नंतरच्या दोन दिवसांत आमचे तर्क खरेहि ठरूं लागले. अबदुल शेखच्या

सहीचा एक अर्ज मॅनेजरकडे आला. 'कापलेल्या पायाची भरपाई म्हणून कारखान्याकडून पांच हजार रुपये मिळावे' अशी मागणी त्यानं केली होती!

अबदुलची स्वतःची ही अक्कल नव्हती, आमचे क्रांतिवीर त्याला चिथावणी देत होते, हें उघड होतं. मी अबदुलकडे गेलों व त्याला म्हटलं, "अरे, तूं स्वतःला हास्यास्पद करून घेतो आहेस! कोणत्या आधारावर तूं भरपाई मागतोस? कारखान्यांतल्या कामावर असतांना तुझा पाय गेला असता तर गोष्ट निराळी होती. पण कुठल्या जंगलांतल्या पिराच्या दर्शनाला तूं गेलास, पायांत निवडुंगाचा कांटा गेला तो वेळेवर काढला नाहींस, मूर्खासारखे गांवठी उपाय केलेस, पाऊल सडलं, पोटरी कुजली, अखेर मांडीपर्यंत दुखणं चढलं, आणि तुझा सबंध पाय कापून काढावा लागला! यांत कारखान्याचा गुन्हा कोणता? आणि तूं पांच हजार रुपये भरपाई मागतोस ती कसल्या आधारावर?"

अबदुल गरीब स्वभावाचा आणि समजूतदारहि होता. तो मला म्हणाला, "तुमचं म्हणणं बरोबर आहे. इकडे यायची माझी मुळींच इच्छा नव्हती. मी बारा वर्षांचा असल्यापासून इथें वाढलों. मालकांनीं माझ्या तालीमबाजीचं कौतुक केलं. स्वतःच्या म्हशीचं तीन तीन शेर आटीव दूध मला पाजलं, खुराकसुद्धां खाऊं घातला. त्यांचे उपकार मी कधीं विसरलों नाहीं. केव्हांहि कुस्ती मारून आलों कीं मी आधीं त्यांच्या पायां पडत असे, हें तुम्हांला माहीत आहे. पांच दिडक्यासुद्धां भरपाई मागण्याची माझी इच्छा नाहीं. माझी दानत अशी नाहीं. ही माझी अक्कल नाहीं. पण तात्यांच्या आणि संभ्याच्या तावडींत मी सांपडलों आहे. मी इकडे येतच नव्हतों. पण दहशत घालून बळजबरीनं त्यांनीं मला आणलं आहे. त्यांच्याविरुद्ध जाण्याची सोय नाहीं हें तुम्ही ओळखतांच..."

यावर मी काय बोलणार? तात्या कुलकर्णी व संभू धायगुडे यांना शहाणपणा शिकवायची सोयच नव्हती. जें जें होईल तें पहायचं ठरवून मी स्वस्थ बसलों.

कामगारांच्या सभा होऊं लागल्या. भाषणं होऊं लागलीं. अबदुलचा तुटलेला पाय म्हणजे कामगारांच्या मूलभूत हक्कांचा केवढा मोठा प्रश्न आहे त्याचं वर्णन छोटे मोठे पुढारी करूं लागले. कारखान्याकडून अबदुलला

पांच हजार रुपये मिळालेच पाहिजेत, न मिळाले तर कारखान्यांत संप होईल, असे ठराव पास झाले. 'शेरे–पापडवाडी'चा तुटलेला पाय सगळ्या मराठी वृत्तपत्रांत जाड ठशांतला मथळा बनला !

कारखान्याकडून अबदुल्ला उत्तर गेलं, कीं भरपाई मागण्याचा त्याला कांहीं एक हक्क नव्हता. ती त्याला मिळणार नाहीं. पुन्हां सभा झाल्या, तावातावाच्या भाषणांच्या फैरी झडल्या. संपाची नोटीस देण्यांत आली.

परंतु नव्या कायद्याप्रमाणें सरकारी लवादाकडे हें भांडण गेलं. आणि लवादानं निकाल दिला, कीं अबदुल शेखला भरपाई मागण्याचा हक्क नाहीं, आणि या मुद्यावर कामगारांनीं संप केला तर तो बेकायदेशीर ठरेल.

आम्हांला वाटलं, आठ दिवस उठलेली वावटळ आतां शांत होईल. अबदुल शेख आपल्या गांवीं जाईल. तसं कांहीं घडलं नाहीं. अबदुलचा मुक्काम हलला नाहीं. त्याच्या तुटलेल्या पायाच्या निमित्तानं कामगार–मालकांत झुंज सुरू करण्याचा तात्या आणि संभू या जोडीचा मनसुबा फसला होता. पण ते कच्च्या गुरूचे चेले नव्हते. त्यांनीं आतां एक नवाच मनसुबा काढला. अबदुल्ला जन्माचा पांगळेपणा यावा ही गोष्ट खेदाची आणि शरमेची होती. कारखान्याचे मालक निष्ठुर राक्षस होते. अबदुलच्या पायासाठीं बोटसुद्धां उचलण्याची बुद्धि त्यांना होत नव्हती. पण कामगारबंधूंनीं हें ओळखायला हवं, कीं आपल्यांतलाच एक माणूस पाय गमावल्यामुळें जन्माचा माणसांतून उठून जाणार आहे. त्यांनीं त्याच्या मदतीला धांवायला हवं. अबदुलला एक थैली अर्पण करायला हवी.

प्रमुख कामगारांची एक छोटीशी बैठक भरवून तात्या–संभू या दुकलीनं हे विचार त्यांच्यापुढें मांडले. अबदुल शेखच्या मदतीसाठीं पापडवाडीस एक मोठा संगीत जलसा करण्याचा बेत या बैठकींत मुक्रर झाला. 'जे कां रंजले गांजले, त्यांसी म्हणे जो आपुले' या ब्रीदानं वागणारे आपण आहोंत व कामगारांच्या कैवाराचं कंकण आपण हातांत बांधलेलं आहे असा देखावा करण्यास, व आपला पुढारीपणा टिकविण्यास तात्यांनीं व संभूनं हें नवं निमित्त मोठ्या अक्कलहुशारीनं शोधून काढलं होतं. अबदुलच्या मदतीसाठीं होणाऱ्या संगीत जलशाचा गाजावाजा त्यांनीं सुरू केला. खर्चवेंच वजा जातां कमींत कमी एक हजार रुपये उभे राहिले पाहिजेत असा त्यांनीं

संकल्प सोडला, आणि जलशाची तयारी जंगी प्रमाणावर सुरू केली. तिकिटं आणि हँडबिलं छापून घ्यायसाठीं ते माझ्याकडे आले व मला म्हणाले,

" जलसा अबदुलच्या मदतीसाठीं आहे. यांत कुणालाहि पैची देखील प्राप्ति व्हायची नाहीं. तुम्हीं हें छपाईचं काम फुकट करून दिलं पाहिजे."

मीं म्हटलं " मी छापखान्याचा मॅनेजर आहें, मालक नाहीं."

तात्या हंसले व म्हणाले, " पण तुमच्या मनांत असलं कीं होतंय सारं. आमची चेष्टा करतां होय ?"

आवाज केव्हां उंच करावा अन् काम साधून घ्यायसाठीं तो केव्हां खालीं उतरवावा तें या धंदेवाईक पुढाऱ्यांना उत्तम प्रकारें कळत असे. माझ्या मनांत आलं, संभू–तात्याच्या त्या दुकलीला सरळ विचारावं, परवांच्या कामगारांच्या सभेंत कारखान्याच्या मालकांना शिव्या मोजतांना माझाहि उद्धार करणारे तुम्हीच काय ? पण पुन्हां विचार केला, हें भांडण काढण्यापासून कोणता फायदा होता ? अबदुल शेखच्या मदतीसाठीं करण्यांत येणारा जल्सा म्हणजे एक सत्कार्य होतं. नेहमींचे भांडणतंटे विसरून तो यशस्वी करणं सगळ्यांचं काम होतं. छपाई फुकट करून देण्याचं आश्वासन देऊन मीं संभू–तात्यांना वाटेला लावलं.

जलशाच्या तिकिटांचे दर पांच रुपयांपासून चार आण्यांपर्यंत ठेवण्यांत आले. संभू–तात्यांची खरी मदार साहजिकच पुढच्या रांकांतलीं भारी किंमतीचीं तिकिटं खपविण्यावर होती. त्या तिकिटांच्या चोपड्या घेऊन ते पापडवाडींतल्या बड्या लोकांच्या बंगल्यांचे उंबरठे झिजवूं लागले. ज्यांच्याविरुद्ध कामगारांना चिथविण्यासाठीं व्यासपीठावर राणाभीमदेवी भाषणें करतांना या दोघांनीं आपल्या जिभांचे पट्टे सैल सोडले होते, त्यांच्याचकडे जाऊन " आपल्या आशीर्वादावर सारं अवलंबून आहे. आपल्या नांवचीं किती तिकिटं फाडूं सांगा " अशी साखरपेरी भाषा बोलतांना त्यांना बिलकुल संकोच वाटला नाहीं. एकाच तोंडांतून सोयी-प्रमाणें गरमनरम भाषा कशी काढतां येते तें तुम्हां–आम्हांला कळायचं नाहीं. त्याला पुढारीपणाचा धंदाच करायला हवा !

तिकिटविक्रीबाबतचे हे मनोरंजक चमत्कार पापडवाडीच्या सामान्य नागरिकांना कोठून कळणार ? त्यांच्यांत चर्चा चालू होती ती फक्त

जलशाच्या जवळ येणाऱ्या तारखेबद्दल आणि जलशासाठीं जिला आमंत्रण केलं होतं त्या आवडाबाई यादव नांवाच्या सुप्रसिद्ध गायिकेबद्दल !

जाहिरातींत आवडाबाईच्या नांवामागें ' सुप्रसिद्ध ' असा शब्द घातला होता. परंतु खरं म्हणजे पापडवाडीच्या लोकांनीं या बाईचं नांव विशेष ऐकलेलं नव्हतं. वस्तुस्थिति अशी होती, कीं ही बाई पूर्वी एके काळीं उत्तम गाणारी म्हणून गाजलेली होती, परंतु गेल्या आठ दहा वर्षांत ती धंद्यांतून निवृत्त झाली होती. मिरजेला तिनं एक छोटंसं घर बांधलं होतं. तिथें ती स्वस्थपणें कालक्रमण करीत असे. गाण्याचीं आमंत्रणं आलीं तरी ती स्वीकारीत नसे. संभू धायगुडेचं आणि तिचं दूरचं नातं होतं. एका पाय तुटलेल्या कामगाराच्या मदतीसाठीं जलसा व्हायचाय् वगैरे थापा मारून या जलशाचं आमंत्रण स्वीकारण्यासाठीं त्यानं तिचं मन वळविलं असलं पाहिजे.

जाहिरातींत सुप्रसिद्ध हें विशेषण ज्याप्रमाणें छापण्यांत आलं होतं, त्याप्रमाणेंच बाईबद्दलची इतर माहितीहि देण्यांत आली होती. श्रीमती आवडाबाई कोणकोणत्या बड्या बड्या खांसाहेबांच्या तालमींत तयार झाल्या होत्या त्यांची यादी देण्यांत आली होती. ' एके काळच्या नामांकित रेडिओ स्टार ' असं त्यांचं वर्णन करण्यांत आलं होतं. ' आठ वर्षांनंतर एका थोर गायिकेचें स्वर्गीय संगीत पुन्हां ऐकायला मिळणार ! ' अशी ओळ जाड ठशांत छापली होती. आणि या सुवर्णसंधीचा फायदा घेण्यास चुकूं नका, असं तमाम जनतेला बजावण्यांत आलं होतं...

त्या चार दिवसांत अबदुल शेखच्या मदतीदाखल जलसा आणि सुप्रसिद्ध आवडाबाई यादव यांखेरीज पापडवाडीच्या लोकांना चर्चेला दुसरा विषय नव्हता. लोकांची जिज्ञासा एकदां चाळविली गेली, कीं ज्या व्यक्तीविषयीं ती उत्पन्न झाली असेल तिची माहिती मिळविण्यांत लोक मोठे पटाईत असतात. ती माहिती त्यांना कुठें आणि कशी मिळते देव जाणे. त्यांना ती मिळते खरी. पापडवाडीच्या हॉटेलवाल्यानं आवडाबाईची एक जुनी रेकॉर्ड कुठें तरी मिळविली आणि ' राधेकृष्ण बोल ' हें पद त्याच्या दुकानांत अष्टौप्रहर वाजूं लागलं. आवडाबाईच्या खाजगी आयुष्यांतल्या गोष्टीहि कांहीं उद्योगी लोकांनीं संशोधन करून उघडकीस आणल्या, व त्या

तोंडातोंडीं पसरूं लागल्या. या संशोधनांत अशीहि माहिती मिळाली, कीं आवडाबाई एके काळीं अट्टल दारूबाज होती, आणि तरुणपणीं तिनं खूप नाचरेपणा केला होता, मुंबईतल्या चंगीभंगी लोकांची ती प्यार होती...

या रंगदार माहितीमुळें आवडाबाईला पाहण्याची लोकांची इच्छा विशेषच प्रबळ झाली. खालच्या दरांचीं तिकिटं जास्त खपूं लागलीं. जलशाच्या रात्रीं थिएटरवर तोबा गर्दी उडाली. पुढच्या रांकांचीं तिकिटं ज्यांनीं घेतलीं होतीं त्यांनीं कांहीं गाणं ऐकण्याच्या हेतूनं नव्हे, तर सत्कार्याला मदत करायला हवी एवढ्याच बुद्धीनं पैसे दिले होतें. त्यांच्यापैकीं बहुतेक जण घरींच राहिले होते. त्यामुळें पुढच्या रांकांतल्या बऱ्याच खुर्च्या प्रारंभीं रिकाम्या होत्या. पण हळुंहळूं निराळींच माणसं त्या जागांवर येऊन बसलीं. एकेका खुर्चीचा रुपाया दीड रुपाया काय मिळेल तो ‘ खिशांत घालून ’ संभू—तात्या या आयत्या वेळच्या गिऱ्हाइकांना आंत सोडीत होते. जलशाची पहिली घंटा झाली तेव्हां पुढच्या रांका भरून गेल्या होत्या. बाकीचं थिएटर तर केव्हांच गच्च भरून गेलं होतं. अबदुल शेखला पहिल्या रांकेंतल्या मधल्या खुर्चीवर बसविण्यांत आलं होतं. सारीं माणसं त्याच्याकडे बोट दाखवून आपापसांत कुजबुजत होतीं आणि पडदा वर जाण्याची वाट पहात होतीं.

अखेर पडदा वर गेला. लोकांनीं अगदीं डोळे ताणून ताणून व्यासपीठावर बसलेल्या आवडाबाईकडे पहिली अधाशी नजर टाकली. उंची भरजरी शालू, नाकांतली चमकी, कानांतल्या उंची कुड्या, हातांतल्या बोटांवर चमकणारे आंगठ्यांचे खडे, असा थाट पाहून ते खूष झाले. पण आवडाबाईच्या सुटलेल्या अवजड शरीराचा काळा कुळकुळीत रंग, चपटं नाक, बटबटीत डोळे, हनुवटीखालची गळ्याची लठ्ठ वळकटी, दारूच्या व्यसनामुळें धुंदावलेली भकास नजर, आणि पावडरच्या थराखालींहि न लपलेल्या तोंडावरच्या सुरकुत्या नजरेंत भरल्याबरोबर प्रेक्षकांतून ‘ हात्तेच्या ! ’ असे उद्गार आणि चीत्कार उठले. कांहींनीं तर शंका काढली, कीं ‘ ज्यांत मारे डौलानं मोगऱ्याची वेणी माळलेली होती ते आवडाबाईचे केस खरे नव्हते. तिनं खोटा टोप घातला होता. ’ श्रोत्यांच्या एका विवक्षित भागांत प्रथम उठलेली ही कुजबुज वेगानं पसरली, आणि एकदम पुष्कळ लोकांना खोकला आला व फिदी फिदी हंसण्याचे आवाज ठिकठिकाणीं झाले...

तथापि आवडाबाईनं पहिल्या चिजेला सुरुवात केल्यावर श्रोत्यांची ही प्रतिक्रिया थांबली. आवडाबाईच्या आवाजांत आतां म्हातारपणाची छटा आली होती. आठ वर्षं सराव सुटल्यामुळें गाण्यांतला नीटनेटकेपणा व हमखासपणा नाहींसा झाला होता. तथापि किती झालं तरी तिनं एके काळीं मैफली जिंकलेल्या होत्या. तिच्या आवाजांत जात्या फार माधुर्य होतं. शब्दांच्या उच्चारांत लोच होता. लोक शांतपणानं गाणं ऐकून घेऊं लागले. पहिली चीज जरी विशेष रंगली नाहीं तरी पडलीहि नाहीं. ती संपल्यावर कुणीतरी मोठ्यांदां ओरडलं, " आतां राधेकृष्ण होऊं द्या. " " हां हां. बरोबर आहे. राधेकृष्ण होऊं द्या " असा दहा वीस आवाजांनीं गिल्ला केला. आवडाबाईच्या म्हाताऱ्या तोंडावर हास्य फुटलं. एके काळीं विलक्षण गाजलेलं तें भजन तिनं सुरू करतांच सबंध थिएटरांत टाळी कडाडली, गॅलरींतल्या कांहीं लोकांनीं पाय आपटून ताल धरला, आजूबाजूंचे लोक मोठ्यांदा ओरडले, " ए! अरे ए! गप्प बसा. " सगळीकडे शांत झालं. भजनाचं कडवं संपून आवडाबाई पुन्हां पालुपदावर आली तेव्हां टाळ्यांचा गजर झाला. आवडाबाईच्या गाण्यावर लोक खूष झाले. तिच्या म्हातारपणाकडे डोळेझांक करण्याची त्यांची तयारी झाली. जलसा उत्तम प्रकारें पार पडणार असं वाटूं लागलं.

पण तितक्यांत एक अपशकुन झाला!

' राधेकृष्ण बोल ' संपविल्यानंतर आवडाबाईनं विंगमध्यें उभ्या राहिलेल्या संभू धायगुडेला डोळ्याची खूण करून जवळ बोलावलं, आणि त्याच्या कानांत ती कांहींसं बोलली. त्यानं मान हालविली, पावलं पुढें टाकून स्टेजच्या अगदीं कडेपर्यंत तो पुढें आला आणि लोकांना गप्प राहण्याची खूण करण्यासाठीं हात उंचावून तो म्हणाला, " बाई आपल्याला विचारतात, त्यांनीं काय गावं अशी आपली इच्छा आहे? आपण ' फर्मास ' कराल त्याप्रमाणें त्या म्हणतील. "

हे शब्द ऐकतांच " भले भले! शाबास! " असा एकच गजर झाला आणि जिकडून तिकडून बंदुकीच्या गोळ्या सुटाव्या त्याप्रमाणें फर्माशी सुटूं लागल्या. ' माझ्या व्हटाचं डाळिंब फुटलं! ' ' माझ्या खिडकींत आलं पाखरूं! ' ' मारे कट्यारी मर जाना! ' एक ना दोन, डझनभर चित्रपटांतली

गाणीं सुचविण्यांत आलीं. एकाची सूचना दुसऱ्याला पसंत नव्हती. त्यामुळें "हेंच झालं पाहिजे" "नको नको! हें नाहीं पाहिजे" अशा उलट सुलट आरोळ्या उठूं लागल्या, आणि प्रेक्षकांत तट पडून थोडीशी गुद्दागुद्दी देखील सुरू झाली. आवडाबाईनं संभूला पुन्हां खूण करून जवळ बोलावलं व त्याच्या कानांत कांहीं सांगितलं. तो पुन्हां लगबगीनं स्टेजच्या कडेशीं आला व ओरडला, "लोकहो, बाई म्हणतात मी खानदानी संगीत गाणारी आहे. सिनेमांतलीं चावट गाणीं मी नाहीं म्हणणार!"

'चावट' शब्दानं घात केला. ज्यांनीं फर्माश केली होती त्यांना वाटलं आपला अपमान झाला. ही म्हातारी आवडाबाई अशी कोण मोठी गाणारी लागून गेली आहे, कीं तिनं सिनेमांतलीं गाणीं चावट ठरवावीं? आम्हीं सुचविलीं तींच गाणीं झालीं पाहिजेत, नाहीं तर जलसा बंद करा आणि आमचे पैसे परत टाका, अशा आरोळ्या लोक ठोकूं लागले. संभू आणि तात्या दोघेजण स्टेजच्या दोन्ही टोकांना उभे राहिले आणि "शांत व्हा, शांत व्हा!" म्हणून ओरडूं लागले. परंतु प्रेक्षकांचा गिल्ला थांबेना. शेवटीं तात्या कुलकर्ण्यांनीं अगदीं ठेवणींतला उंच आवाज काढून बेंबीच्या देठापासून ओरडून जाहीर केलं कीं प्रेक्षकांकडून सुचविल्या गेलेल्या पदांपैकीं कांहीं पदं बाई म्हणतील. पण तीं विश्रांतीनंतर. आधीं त्या एक सुंदर ठुमरी म्हणणार आहेत. त्यानंतर विश्रांतीच्या वेळांत अबदुल शेखला थैली देण्याचा समारंभ होणार आहे. लोकांनीं कृपा करून शांत व्हावं.

मला कांहीं वाटलं नव्हतं लोक शांत होतील. पण ते झाले. लोकांची गर्दी झाली, कीं त्यांच्या मनाची लहर केव्हां कशी फिरेल त्याचा नेम नसतो हेंच खरं. लोक गप्प झाले. आवडाबाई ठुमरी म्हणूं लागली. 'ना मारो पिचकारी!' म्हणतां म्हणतां ती थोडासा आदाहि करूं लागली, त्यामुळें लोक पुन्हां खुषींत आले. जलसा उधळला जाणार अशी जी भीति मध्यंतरीं उद्‌भवली होती ती टळली. ठुमरी संपल्याबरोबर संभू स्टेजवर पुढें आला आणि ओरडला, "आतां विश्रांति, पण कुणीं बाहेर जायचं नाहीं. सगळ्यांनीं आपापल्या जागेवर बसून रहायचं. कारण अबदुल शेखला थैली देण्याचा समारंभ आतां व्हायचाय्."

पडदा टाकला गेला. संभूनं बाहेर येऊन अब्दुलला आंत नेलं. शेजारच्या तालुक्यांतल्या कॉंग्रेस कमिटीच्या अध्यक्षांना या समारंभाचं अध्यक्षस्थान स्वीकारण्यासाठीं तात्यांनीं मुद्दाम आणलं होतं, त्यांनाहि आंत नेण्यांत आलं. पडदा पुन्हां वर गेला तेव्हां मधोमध तालुका कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष येसाजी फटाळे, त्यांच्या डाव्या बाजूला दोन्ही कुबड्या डाव्या हाताशीं उभ्या धरून बसलेला अबदुल शेख, तात्या, आणि संभू अशी चौकडी टेबलामागच्या खुर्च्यांवर विराजमान झालेली लोकांना दिसली. तुरळक टाळ्या झाल्या. पांच दहा लोकांनीं शिट्याहि फुंकल्या. तात्या कुलकर्ण्यांचं भाषण झालं. सारा खर्चवेंच वजा जातां जलशाच्या उत्पन्नांतून राहिलेल्या रकमेची थैली कॉंग्रेसचे सुप्रसिद्ध पुढारी येसाजी फटाळे यांनीं अबदुल शेखला अर्पण करावी अशी सूचना त्यांनीं केली व ते आपल्या खुर्चीवर बसले. फटाळ्यांनीं चांचरत, अडखळत कांहींतरी बडबड केली. पण त्यांच्या अडीच मिनिटांच्या मुळुमुळु आवाजांतल्या भाषणांत गांधी, नेहरू, सरदार पटेल यांचीं नांवं दोन चार वेळां ऐकूं आलीं. रवींद्रनाथ टागोर यांचंहि नांव त्यांनीं एकदां उच्चारलं अशी मला शंका आली. भाषण संपवून त्यांनीं किनखापी कापडाची एक लहानशी थैली पुढें केली. अबदुलनं आपल्या दोन्ही खाकांत कुबड्या लावल्या आणि थैली घेण्यासाठीं तो पुढें आला.

प्रेक्षकांकडे वळून सलाम करून तो आपल्या जागेवर खुरडत जाणार होता, पण तितक्यांत वरून कुणीतरी मोठ्यांदा ओरडलं, " थैली उघडून दाखवा ! थैलींत किती पैसे आहेत सांगा ! "

ही मागणी इतरांनीं उचलून धरली. आणि जिकडून तिकडून आरोळ्या उठल्या, " थैली उघडा ! पैसे दाखवा ! "

अबदुल गोंधळून उभा राहिला. अशा प्रकारें थैली उघडून पाहणं बरं नव्हे अशा अर्थाची त्यानं चर्या केली. तो हलक्या आवाजांत कांहींसं पुटपुटलाहि. परंतु लोक आणखीच उंच ओरडूं लागले, " थैली उघडायला पाहिजे. पैसे दाखवायला पाहिजेत ! ए अब्दुल, खोल्रे, खोलो कसा ! "

अखेर नाइलाज झाल्यामुळें अबदुलनं थैलीच्या तोंडापासली गांठ सोडली, आणि थैली उलटी करून टेबलावर आपटली. छोट्या छोट्या नोटांचं एक

लहानसं बंडल टेबलावर पडलं. एक सुटा रुपया खण्दिशीं वाजला. लोक ओरडले, " मोज मोज ! " अबदुल नोटा मोजूं लागला. त्याच्याबरोबर लोकही " चार, पांच, सहा... " अशा मोठ्या आवाजांत मोजूं लागले. पांच पांच रुपयांच्या वीस नोटा होत्या !

तें पाहून मी थक्कच झालों. थिएटरांतल्या गर्दीवरून जलशाला चांगलं सातआठशें उत्पन्न झालेलं दिसत होतं. संभू—तात्यांनीं कारखान्याच्या मॅनेजरां-कडून थिएटर फुकट मिळविलं होतं. तिकिटं, हँडबिलं माझ्याकडून फुकटांत छापवून घेतलीं होतीं. म्हणण्यासारखा खर्चवेंच कांहींच झाला नव्हता. निदान पांचशें सहाशें रुपये अबदुलच्या हातीं पडायला हवे होते...मी थक्कच झालों. पण गप्प बसलों. गप्प राहण्याची ही तयारीच आम्हां पांढरपेशा लोकांना नेहमीं नडत असते...

परंतु थिएटरांतल्या वरच्या भागांतले लोक सभ्यतेच्या दडपणाखालीं गप्प बसणारे नव्हते. त्यांनीं एकदम आरडाओरडा सुरू केला. " काय, फक्त शंभर रुपये ?" " अबदुल, तुला फसवलंय् " " अरे बाकीचे पैसे माग ! " अशा आरोळ्या उठल्या. अबदुलवर त्याचा पारिणाम झाला. त्यानं वळून संभू आणि तात्या दोघांकडेहि पाहिलं. ते खुर्च्यांवर बसलेले त्याला दिसले नाहींत. आपापल्या जाकिटांचीं खालचीं टोकं ओढून घेतल्याप्रमाणें धरून ते अस्वस्थपणें उभे होते. जणूं ते तेथून सटकण्याच्या विचारांत होते. त्या दोघांकडे नजर रोखून अबदुल म्हणाला, " तात्या, संभ्या, माझे बाकीचे पैसे टाका. "

संभू किंचित् गांगरून गेल्यासारखा उभा राहिला, पण तात्या दटा-वणीच्या उद्धट स्वरांत म्हणाले, " तुझे बाकीचे पैसे ? खूळ लागलं काय तुला ? खर्चवेंच वजा जाऊन जेवढे उरले तेवढे ' सगळे ' तुला दिले आहेत. एकशेंएक रुपये कमी झाले होय ? "

" मला कमी अगर जास्त होण्याचा प्रश्न नाहीं तात्या " अबदुल दृढ स्वरांत म्हणाला, " वाटलं तर हे सगळे पैसे तुम्ही परत घ्या. मला भीक नाहीं लागली. पण मला एकशेंएक रुपये देतां, बाकीचे काय केलेत सांगा ! "

प्रेक्षकांतून आरोळ्या उठल्या, " भले शाबास! अब्दुल, होऊन जाऊं दे!" आवडाबाईच्या गाण्यापेक्षांहि अधिक मनोरंजक असं कांहीं तरी घडूं लागलेलं पाहून गॅलरींतला आणि पिटांतला प्रेक्षकवर्ग खुषींत आला होता. " तात्या, बोला कीं. बाकी पैसे काय झाले?"

तात्या जाकीट सांवरीत दोन पावलं पुढें आले व म्हणाले, " काय झाले म्हणजे काय? खर्च झाले. उद्यां पापडवाडीच्या मोठ्या चौकांतल्या नोटीस बोर्डावर सारा हिशोब लावला जाईल, काळजी करूं नका! तुम्हांला वाटत असेल या जलशाला विशेष खर्च झाला नाहीं. पण तसं नाहीं. आवडा-बाईला आणायसाठीं स्पेशल मोटार मिरजेस धाडली, आणखी तिला पुन्हां पोंचवायसाठीं धाडावी लागणार आहे. तिचाच खर्च पन्नास रुपये होईल. असेच दुसरे किती तरी खर्च–"

त्यांचं तें वाक्य पुरं होण्याच्या आधींच एक झिंज्या फिस्कारलेला, मळकट पॅंट आणि बुशकोट घातलेला दांडगा माणूस विंगमधून पुढें आला, व तात्यापुढें उभं राहून म्हणाला, " वा वा तात्या! चांगल्या बाता मारतां! आवडाबाईला आणण्याचं अन् पोंचवण्याचं काम मी हौसेनं अंगावर घेतलं. मीं तुमच्याकडे दमडी तरी मागितली? अन् या लोकांना काय सांगतां, पन्नास रुपये खर्च होणार आहेत. वा राव!"

संभू इतका वेळ मागं उभा होता तो पुढें आला व एक शिवी हांसडून ड्रायव्हरला विंगकडे लोटूं लागला. ड्रायव्हरनं त्याचं मनगट धरून इतक्या जोरानं त्याला झटकलं, कीं तो स्टेजवर सपशेल पालथा पडला आणि त्याच्या जाकिटाच्या आंतल्या खिशांतून रुपये, अधेल्या, पावल्या सांडल्या, त्यांचा खळखळाट झाला.

माडीवरून कोणसं ओरडलं, " हा घ्या हिशोब!" हंशा झाला. टाळ्या झाल्या! तितक्यांत अब्दुलनं उजव्या खाकेंतली कुबडी काढून फेंकली, तात्यांना हिसडा मारून त्यांचं तोंड आपल्याकडे फिरविलं, त्यांच्या जाकिटाची एक बाजू इतक्या जोरानं ओढली कीं गुंड्या तटातट तुटून उडाल्या, आणि आंतल्या खिशांत हात घातला. " सोड. मला सोड!" असं किंचाळून तात्यांनीं धडपड केली. पण अब्दुलनं त्यांच्या खिशांतून हात बाहेर काढला तेव्हां कितीतरी नोटा लोकांना दिसल्या! मघांचा माणूस

ओरडला, " हा घ्या हिशोब ! " हंशा, टाळ्या, शिट्या सगळं कांहीं झालं! अबदुल तात्यांचे खिसे उपशीत होता. तो ड्रायव्हर संभूचे खिसे रिकामे करीत होता. संभू आणि तात्या दोघेहि धडपड करीत होते, तोंडानें शिव्या देत होते. पण त्या ड्रायव्हरच्या आणि अबदुलच्या मगरमिठींत ते पक्केच सांपडले होते. त्या देखाव्यानं प्रेक्षकांची भयंकर करमणूक होत होती, व त्यांनीं टाळ्याशिट्यांचा गजरच चालू ठेवला होता ! मधेंच माडीवरून एक वहाण भिरभिरत आली आणि स्टेजवर पडली ! दुसऱ्याच क्षणीं आणखी एक आली. तिसरी यायला वेळ लागला नाहीं. " मारा, ठोका " अशा आरोळ्या उठल्या. माडीवरचे लोक उठूं लागल्यासारखी चाहूल झाली.

तें पहातांच आतां भलताच प्रकार व्हायला वेळ लागणार नाहीं अशी भीति मला वाटली. मीं पाहिलं तों स्टेजवरच्या अध्यक्षांची खुर्ची रिकामी दिसली. तालुका कॉंग्रेस कमेटीच्या अध्यक्षांनीं हळूच पोबारा केव्हां केला होता तें कुणाच्या लक्षांतहि आलं नव्हतं. मी उठलों आणि धांवत आंत गेलों. आधीं पडदा टाकायला सांगितला. पडदा पडलेला पाहिल्याबरोबर बाहेरच्या लोकांनीं ओरडा केला ! सारे लोक उठल्यासारखे आवाज झाले. मी आधीं संभूला आणि तात्यांना ओढून बाहेर आणलं, आमच्या मॅनेजरांची गाडी बाहेर उभी होती तिच्यांत त्या दोघांना कोंबलं, आणि ड्रायव्हरला म्हटलं, " या दोघांना घेऊन वाटेल तिकडे जा ! आटप. " मग मी पुन्हां आंत आलों. पुष्कळसे लोक आंत घुसले. " कुठाय् तात्या कुलकर्णी ? " " कुठें आहे संभ्या धायगुडे ? " असा एकच हलकल्लोळ त्यांनीं केला. पण ते दोघे आंत कुठें दिसेनात तेव्हां लोकांची झुंबड बाहेर पडली. मीं स्टेजवरच्या टेबल खुर्च्या काढवल्या. सहाशें त्रेपन रुपये आठ आणे मोजले, व ते थैलींत भरले. आवडाबाईला बोलावून व्यासपीठावर बसविली. अबदुलला मिळालेल्या पैशांचा आंकडा जाहीर करायचा आणि आवडाबाईचं गाणं पुढं चालू करायचं, असं मीं मनाशीं ठरविलं. घंटा द्यायला सांगितली. पडदा वर गेला. थैली हातांत घेऊन मी स्टेजच्या कडेला गेलों—

पण पाहतों तों काय ?

थिएटर जवळ जवळ रिकामं होतं!

लोक खुशाल आपल्या घरोघर निघून गेले होते! अर्धा जलसा त्यांना ऐकायला मिळाला होता. कार्यक्रमांत जाहीर न झालेल्या दोन कुस्त्या त्यांना पहायला मिळाल्या होत्या. आपले पैसे वसूल झाले असं मनाशीं त्यांनीं ठरवलं असावं!

आवडाबाई गाऊं लागली तरी निघून गेलेले लोक परत आले नाहींत! जलशाचा उत्तरार्ध ऐकायला पुरते पांच पन्नास देखील लोक हजर नव्हते.

दुसऱ्या दिवशीं पापडवाडींत जिकडे तिकडे रात्रीच्या जलशाची चर्चा लोक करीत होते. "फार मजा आली" असं जो तो दुसऱ्याला सांगत होता.

माझंही मत असंच होतं कीं जलसा फार यशस्वी झाला. कारण एक तर अबदुलला सहाशें त्रेपन रुपये आठ आणे मिळाले होते आणि दुसरी महत्त्वाची गोष्ट ही होती, कीं संभू—तात्यांची दुक्कल बदनाम होऊन पळून गेली होती!

मात्र या स्वाऱ्या आतां पुन्हां पापडवाडीस तोंड दाखवणार नाहींत, असं जेव्हां लोक म्हणत, तेव्हां मी मान हलवून त्यांना म्हणत होतों, "त्याचा मात्र नियम सांगूं नका. बदनामीनं पुढारीपणाचीं पिसं गळलीं तरी, नवी संधि साधून, नवीं पिसं लावून पुन्हां लोकांपुढें पुढारी म्हणून मिरविण्याची कला संभू—तात्यांसारख्या लोकांना साधलेली असते. आणि योग्य संधि साधून संभू—तात्या इथें आले तर पुन्हां त्यांचीं भाषणं ऐकायला लोक कमी करायचे नाहींत! लोक इतके गाढव आहेत!"

त्या एका दृष्टिक्षेपांत तिची खात्री झाली, कीं आपल्याला खोटा भास झाला नाहीं. ज्याला इंदुताईशीं ओळख करून देण्यासाठीं प्रदर्शनाच्या चालकांनीं हांका मारून बोलावलं होतं, तो आपल्या चांगल्या परिचयाचा होता. फरक इतकाच कीं आपण त्याला गणू म्हणत होतों. आतां प्रदर्शनाच्या चालकां-सारखे बडे बडे लोक त्याला गणपतराव म्हणत होते...अशोकचा हात घट्ट पकडून पाठ वळवून ती उभी राहिली. "तुमचीं चित्रं फार चांगलीं आहेत..." असं कांहीं तरी तिची मालकीण बोलत होती, "हे मोठे कल्पक आहेत, धाडसी आहेत, यांनीं चित्रांच्या साहाय्यानं चालविलेला दारूबंदीचा प्रचार सरकारला फार आवडला आहे..." असं कांहीं तरी प्रदर्शनाचे चालक सांगत होते, तीं बोलणीं हिराला ऐकूं येत होतीं, पण तिचं मन एकदम चार वर्षं ओलांडून मागं गेलं होतं, तिच्या आयुष्यांतल्या त्या गोड दिवसांच्या आतां कडू झालेल्या आठवणी तिला होत होत्या...

जिनगर गल्ली नांवाच्या गल्लींत गणू रहात असे. त्याच्या कुटुंबाचा मूळचा धंदा कापडाच्या जिनगरी बाहुल्या करण्याचा होता. पण लहानपणा-पासून शाडूच्या मूर्ती करण्याचा छंद गणूला लागला, व कुणाकडे न शिकतां स्वतःच्या हुशारीनंच तो सुंदर सुंदर मूर्ती करूं लागला. त्याच्या हातचे गणपती तर लोकांना फारच आवडूं लागले. गणूच्या हातचा गणपती विकत घ्यायचा असं जो तो म्हणूं लागला. आषाढ महिना सुरू झाल्या-पासून लोक गणूकडे येऊन ऑर्डरी देत. निरनिराळ्या आकारांच्या आणि निरनिराळ्या आसनांच्या गणपतीच्या दीडदोनशें मूर्ती गणूला तयार कराव्या लागत. गणूच्या घराला दोन महिने एका मोठ्या कारखान्याचंच स्वरूप येई. प्रथम माती भिजविण्याच्या, शाडू घोटण्याच्या, चिंध्या कुटण्याच्या कामावर म्हणून हिरा गणूकडे जायला लागली. तिच्या बापाला एका कचेरींत पट्टेवाल्याची नोकरी होती. पण पगाराच्या तुटपुंज्या पैशावर संसाराचा खर्च भागून त्याच्या दारूसाठीं पैसे उरणार कुठून? लेकीनं घरांतलं सैंपाकपाणी संभाळून बाहेर कुठं काम करून रोज आठ दहा आणे आणले तर त्याला हवेच होते. गणूकडे हिरा काम करूं लागल्यानं तिच्या बापाची मोठी सोय झाली. वर्षाकाठीं गणेशचतुर्थीच्या पूजेसाठीं एक सुंदर गणपतीहि मोफत मिळूं लागला. हिराचा बाप तिच्यावर खूष झाला. तिचं वय

आतां लग्नाचं झालं होतं. परंतु घरकाम संभाळणारी आणि शिवाय रोज आठ दहा आणे घरांत आणणारी मुलगी घराबाहेर जाऊं द्यायला म्हातारा फारसा उत्सुक नव्हता. तिच्या वाढत्या वयाकडे तो डोळेझांक करीत होता.

पण हिराच्या ज्या नवतारुण्याकडे तिचा बाप डोळेझांक करीत होता, त्याकडे गणूची दृष्टि आकृष्ट झाल्यावांचून राहिली नाहीं. प्रथम प्रथम एक मोलकरीण पोरगी म्हणून त्यानं तिच्याकडे धड पाहिलंहि नव्हतं. पण एक दिवस ती शाडूचा लगदा मळीत असतांना, तो पुरेसा मऊ झाला कीं नाहीं तें पाहण्यासाठीं तो हिरापुढं उभा राहून वांकला तेव्हां तिचं तोंड त्याला अगदीं जवळून दिसलं, आणि तें दिसल्याबरोबर तिचं तरतरीत नाक, मोठमोठे डोळे, आणि दोन्ही कानांवर आलेल्या तिच्या केसांच्या बटा त्याच्या मनांत एकदम भरल्या. चिमटींत उचलून घेतलेला शाडू चोळीत तो हंसला व म्हणाला,

"छान केलं आहेस. दमलीस होय?"

हिरा म्हणाली, "दमायला काय झालंय?"

तिच्या कोपरापर्यंत बरबटलेल्या हाताकडे पहात गणू म्हणाला, "असलं मजुरीचं काम करण्यापेक्षां दुसरं एखादं काम करायला हवंस तूं."

ती म्हणाली, "दुसरं कुठलं काम येतंय मला?"

"शिकवलं तर करशील?"

"काय शिकवणार तुम्ही?"

"बाहुल्या करायला शिकशील?"

"मला येईल, म्हणतां?"

"न यायला काय झालं? आतां बघूंच या कीं. ऊठ पाहूं. हात धुऊन टाक, अन् तिकडे माझ्या घडवंचीकडे चल."

तेव्हांपासून हिरा मातीच्या बाहुल्या शिकूं लागली.

गणूला कोणी शिकविलं नव्हतं. तो आपल्या स्वतःच्या कल्पकतेच्या बळावर मूर्तिकार झाला होता. पण हिराला त्याच्यासारखा शिकविणारा मिळाला आणि नुसतंच शिकविणारा नव्हे तर तिच्यावर प्रेम करून शिकविणारा मिळाला. प्रथम कांहीं दिवस तिच्या लक्षांत यावं इतकं उघड त्याचं प्रेम नव्हतं. पण ती नुसतीच देखणी नव्हती तर तितकीच हुषारहि होती हें कळल्यावर गणूचं

तिच्यावर अधिकच प्रेम जडूं लागलं व तिच्या वयाबरोबरच तिच्या भावनाहि जाग्या झाल्या असल्यामुळं गणूला आपल्या नादाला आणखी लावावं असा हेतु तिच्या ठिकाणीं हळू हळू जागा होऊं लागला. मूर्ति करण्याचं कसब ती अधिकाधिकच दाखवूं लागली व त्याबरोबरच गणूच्या प्रेमाला ती आपल्या बोलण्याचालण्यानं अधिकाधिक स्पष्ट जबाब देऊं लागली. एके दिवशीं गणू तिला म्हणाला,

"हिरे, तूं आतां या धंद्यांत चांगली वाकबगार झालीस. आतां बाहुल्या करण्याचं स्वतंत्र दुकान काढ."

घडवंचीवरच्या मुरलीधराचे डोळे कोरतां कोरतां थांबून लांकडाची नाजुक कोरणी ओठाला लावून तिरप्या मानेनं बघत हिरा म्हणाली, "कां? मला कंटाळलांत कीं काय? तुमच्याकडे मी यायची बंद व्हावी म्हणून सांगतां होय निराळं दुकान काढायला?"

"तसं नव्हे ग. तूं आपलं स्वतःचं दुकान काढलंस तर पैसे जास्त मिळतील."

"चुलींत घाला ते पैसे. पैसे मिळवून तरी बापाच्या दारूचीच भर करायची कीं नाहीं? तुमच्याकडे पैशासाठीं मी येतें असं समजतां कीं काय?"

"पैशासाठीं नाहीं तर कशासाठीं येतेस ग?"

"कशासाठीं येतें तें तुम्हांला माहीत नाहीं होय?"

"माहीत आहे, पण तूं आपल्या तोंडानं सांग कीं."

घडवंचीपलीकडच्या फळीवर रंगांचे पेले भरलेले होते. त्यांतला एक उचलल्यासारखं करून हिरा म्हणाली, "आतां बस्स करा चावटपणा, नाहीं तर हा रंग ओतीन तोंडावर."

गणू हंसून दूर झाला, पण तिनं रंगाचा पेला जागच्या जागीं ठेवला न ठेवला तोंच परत वळून त्यानं तिला हातानं ओढली आणि "अहो! अहो!" असं ती म्हणत असतांनाच तिला घट्ट मिठींत धरून त्यानं तिचा मुका घेतला.

हळके हळके दोघांत आडपडदा राहिला नाहीं. गणू म्हणजे हिराचं परब्रह्म झालं. पुरुषाच्या प्रेमांत सांपडणाऱ्या बायका कितीहि अशिक्षित असल्या तरी अविचाराच्या पहिल्या सरी कोसळून गेल्यानंतर प्रेमाच्या परिणामाचे गंभीर विचार त्यांच्या मनांत येऊं लागतात. हिराच्याहि मनांत ते हळू

हळू येऊं लागले. आपण या प्रेमाच्या खळखळाटांत वाहात गेलों आणि गणूच्या आधीन झालों, पण केवळ खेळ म्हणून या गोष्टी आणखी किती दिवस चालायच्या, असं ती स्वतःला विचारूं लागली. या गोष्टी गणूजवळ बोलण्यासारख्या नाहींत, विचारल्या तर तो रागावेल, आपला संबंधच तोडून टाकील, अशी भीति तिला वाटत असे. परंतु त्या भीतीपेक्षां मनांतली चिंता जेव्हां तिला अधिक त्रास द्यायला लागली तेव्हां तिला गप्प राहवेना. एकदां ती गणूला म्हणाली,

" आतां जाऊं द्या, सोडा कीं मला. अंबाबाईच्या देवळांत शेजारतीची घांट वाजली, ऐकली नाहींत ? "

तिच्या गालावर टिचकी मारीत गणू म्हणाला, " तुझ्या मिठींत असा पडलों कीं बाहेरच्या जगांतलं मला कांहीं ऐकूं येत नाहीं. खरंच घांट वाजली म्हणतेस ? "

" नाहीं तर ? आणखी उशीर केला घरीं जायला तर माझा बाप काय म्हणेल ? "

" गणपतीचा सीझन जवळ आलाय म्हणून गणपती करण्याचं काम रात्रीं जागून करावं लागतं, असं त्याला तूं सांगितलंच आहेस कीं ! "

" हो हो. सांगितलंय. पण उशीराला तरी कांहीं सीमा हवी कीं नाहीं ? " तिनं त्याचे केस पकडून जरा जोरानंच कपाळ उचलल्यासारखं केलं आणि एकदम गंभीर चर्येनं त्याच्याकडे पहात राहून विचारलं, " एक गोष्ट सांगतां कां मला ? "

गणूनं मान हलविली.

" शपथेवर सांगायची हं. "

त्यानं पुन्हां मान हलविली.

हिरा म्हणाली, " मी अस्सल मराठा जातीची आहें. तुमची जात निराळी आहे. तुमचा माझा संबंध आहे असं बापाला कळलं आणि त्यानं मला घराबाहेर काढली तर मी काय करूं ? "

" घराबाहेर पड कीं. "

" अन् जाऊं कुठं ? "

" माझ्याकडे ये अन् रहा. "

" नुसती राख म्हणून राहूं होय तुमच्याकडे ? तुम्ही माझ्याशीं लग्नीन कराल कीं नाहीं सांगा. "

" अलबत् करीन. तुला भरंवसा वाटत नाहीं होय माझा ? "

" वाटतो रे बाबा. पण तुमची पुरुषांची जात. कधीं कधीं भय वाटतं— "

" किती वेडी ग तूं ! " असं म्हणून गणूनं तिला जवळ ओढून घेतली.

आणि मग ती जागी झाली तेव्हां देवळांतली घांट वाजतच होती. तिला प्रथम वाटलं शेजारतीची घंटा सुरू झाली तीच अजून वाजते आहे. पण मग तिच्या एकदम लक्षांत आलं कीं काकडआरतीच्या वेळची ती घंटा होती ! " अग बया ग ! आतां मात्र बापाच्या हातचा मार खायला लागतो मला आज ! " असं म्हणून ती एकदम दूर झाली. गणूनं तिचा पदर ओढला. पण " तुला कधीं पुरे होतं कीं नाहीं, " असं फणकाऱ्यानं म्हणून तिनं पदर ओढून घेतला आणि ती खोलींतनं बाहेर पडून घराच्या वाटेला लागली.

पहांटेचा अंधुक उजेड पडला होता. रस्त्यांत शुकशुकाट होता. घांटीचे घणंग् घणंग् असे आवाज ऐकूं येत होते. रात्रीं खूप पाऊस पडून गेला असला पाहिजे. रस्ते भिजून चिंब झाले होते. गटारांतून पाणी झुळझुळत होतं. आभाळांत अजूनहि ढगांची दाटी होती. एखाद्या कौलारावर बसलेले कावळे भिजलेल्या पंखांत चोंच खुपशीत कावकाव करीत होते. एका उंच इमारतीच्या भिंतीला चुन्याची वाटोळी खिडकी होती, तिच्या कंगोऱ्यावर बसलेले दोन हिरवेगार पोपट गमतीदार शब्द करीत होते...बापानं विचारलं तर काय सांगायचं, या शंकेचं भय हिराला वाटत नव्हतं. गणू तिला आपल्या घरांत घ्यायला केव्हांहि तयार होता. तिच्याशीं लग्नीन करणार होता. मग तिला कसली काळजी होती ?...हिरा आपल्याच तंद्रींत झपाझप पावलं टाकीत होती...

घरीं बापानं तिला कांहीं विचारलं नाहीं. आदल्या रात्रीं ढोसलेल्या दारूच्या नशेंत तो निपचित अंथरुणावर पडलेला होता.

पण तिच्या बापानं जें तिला विचारलं नाहीं तें निसर्गानंच तिला एक दिवस विचारलं.

आणि बापाच्या विचारण्याचं तिला वाटलं नसतं इतकं भय, निसर्गानं जो प्रश्न तिच्यापुढं एकदम उभा केला त्या प्रश्नाचं तिला वाटलं...आपली अवस्था कुणाच्या लक्षांत येण्याच्या आंत आपलं आणि गणूचं लग्न झालंच पाहिजे हें तिनं पुरतं ओळखलं.

गणू चालढकल करूं लागला. तिनं प्रथम रागावून रुसून पाहिलं, तरी त्याचीं उडवाउडवीचींच उत्तरं चालू राहिलीं. अखेर ती रडली, त्याच्या पायां पडली, पण गणूला पाझर फुटला नाहीं...मग ती उमजली कीं ज्याला ती गणूचं प्रेम समजली होती तें प्रेम नव्हतं. त्यानं तिच्याशीं नुसता खेळ केला होता. बेगडी वर्खाला ती सोनं समजली होती. स्वतःच्या भोळेपणानं तिनं आपल्या आयुष्याची खराबी करून घेतली होती...अखेर एके दिवशीं जेव्हां गणूनं तिला नकार देऊन शिव्यागाळी करायला सुरवात केली तेव्हां त्याचा नाद सोडून ती घरीं आली.

तिची अवस्था तिच्या बापाच्या लक्षांत आली तेव्हां त्यानं भयंकर तारांगण केलं. त्या दिवशीं तो चार गुत्ते हिंडून झिंगून घरीं आला आणि लेकीला अचकट विचकट शिव्या देऊन बडवायला त्यानं सुरवात केली. शेवटीं तर त्यानं चुलींतलं जळतं लांकूड काढून तिच्या डाव्या दंडावर डाग दिला... हिराच्या मनांत आलं, गणूला असा झोडपून डाग देणारं कुणी नाहीं का ?

तीन चार दिवस तिचा बाप तिच्याशीं एक अक्षर देखील बोलला नाहीं. तो कसला तरी विचार सारखा करीत होता. त्यानं हळूहळू उमज करून घेतली, कीं लेकीला नुसती मारहाण करून काय होणार ? तिनं स्वतःवर ओढवून घेतलेलं संकट आपणच दूर करायला हवं. तिला घेऊन तो परगांवीं गेला, आणि तिला मोकळी करून परत आल्यावर त्यानं एका म्हाताऱ्या वेडसर मराठ्याशीं तिचं लगीन लावून दिलं... या साऱ्या भोगांतून जातांना हिराला नेहमीं वाटे, गणूला झोडपून डाग देणारं कोणी माणूस नाहीं का ?

तिचा म्हातारा नवरा दीड वर्षांच्या आंतच मेला. हिरा आपल्या बापाकडे परत आली. मोलमजुरी करून आपलं आणि बापाचं पोट भरूं लागली. नवरा नाहीं, मूलबाळ कांहीं नाहीं, अशा अवस्थेंत इंदुताईच्या घरचं काम करतांना ती वरवर आनंदांत असलेली दिसे. पण तिच्या

अंतर्यामींच्या यातना तिच्या तिला माहीत. गणूनं तिच्या हृदयांत केलेली जखम आतां जुनी झाली होती. परंतु कधीं कधीं तिच्या हृदयांत खोल कुठं तरी आवाज निघे, गणूला झोडपून डाग देणारं कुणी माणूस नाहीं का?

गेल्या चार वर्षांत तिनं गणूला पाहिलं नव्हतं. आणि आतां तो तिला एकदम दिसला होता! त्याचे कपडे शुभ्र खादीचे पण परीटघडी ऐटबाज होते. त्याच्या चित्रांच्या प्रदर्शनाची वाहवा होत होती. मोठे लोक त्याला गणपतराव म्हणत होते. ती स्वतः मात्र अर्धं लुगडं नेसणारी, फाटकी चोळी घालणारी मोलकरीण राहिली होती! तिच्या मनाचा भडका झाला. तिला एकदां वाटलं, सरळ पुढं होऊन गणूला विचारावं, "अरे मांगा, माझा कसा घात केलास तें सांगूं का या साऱ्या लोकांना?" पण ही गोष्ट तिला करवली नाहीं. तिला वाटलं या गणूच्या दृष्टीस न पडतां येथून चालतं व्हावं. पण तसंहि कांहीं घडलं नाहीं. आपल्या मुलाला हांक मारून इंदुताई म्हणाल्या, "अरे अशोक, हे बघितलेस का कोण? हीं चित्रं यांनीं केलीं बरं का. ये, यांना नमस्ते कर. हिरा, इकडे आण ग त्याला." अशोकला घेऊन पुढं होणं हिराला भागच पडलं. तिची आणि गणूची दृष्टादृष्ट झाली. कुणाच्याहि लक्षांत न येईल इतक्या बेतानं तो तिच्याकडे पाहून हंसला. क्षणमात्र तिनं आपल्या तोंडावर नाराजी दाखविली, पण लगेच तिला, तिच्या मनांत नव्हतं तरी, हंसायला आलं...

स्टॉलपुढून दूर झाल्यावर हिराच्या मनांत सारखं येत होतं, स्वतःच्या एक जोरांत थोबाडींत मारून घ्यावी. मला हंसायला कुणीं सांगितलं होतं? ज्यानं माझ्या आयुष्याचं वाटोळं केलं त्याला चार वर्षांनीं पाहिल्याबरोबर तो मला पुन्हां हवासाच वाटावा? माझा जीव पुन्हां मायेनं विरघळून जावा? या वेड्या जिवाला आतां म्हणावं तरी काय? छे छे! मीं हंसायला नको होतं. चांगली एक थोबाडींत मारून घ्यायला हवी होती. आतां पुन्हां जर गणू कुठं दिसला तर आपला जीव असा विरघळूं द्यायचा नाहीं.

पण दोन दिवसांनीं गणू तिच्या घरीं आला तेव्हां हिराचा हा निश्चय कोठल्या कोठें नाहींसा झाला. सतरंजीची घडी उलगडून त्याला बसायला देतां देतां, शेजारच्या घरीं जाऊन साखऱ्या उसना मागून आणून त्याच्यासाठीं

चहा करतां करतां, तिची अगदीं धांदल उडून गेली. तिचा निरोप घेतांना गणूनं सतरंजीवर नोटा ठेवल्या तेव्हां ती म्हणाली, "हें काय करतां?"

तो म्हणाला, "असूं देत. मी आतां पुष्कळ श्रीमंत झालों आहें."

ती जरा रागानं म्हणाली, "मला काय करायची आहे तुमची श्रीमंती?"

"असं बोलूं नकोस," तो म्हणाला, "मी तुझ्याशीं लगीन केलं नाहीं, पण त्या चुकीची दुरुस्ती मला आतां करतां येईल. तुला मी पुष्कळ सुखी करीन."

ती एकदम हुंदका देऊन म्हणाली, "मला नका पुन्हां खोटी आशा लावूं!"

"खोटी आशा नाहीं लावत हिरा." तो म्हणाला, "तूं मोलमजुरी काय म्हणून करायचीस? मला आतां चांगले दिवस आले आहेत, तुला हवे तितके पैसे देईन मी. एकदां माझ्याकडे ये, पुष्कळ गोष्टी सांगायच्या आहेत तुला."

तो गेल्यावर पुन्हां उद्वेगाची आणि संतापाची लहर हिराला आली. तिला वाटलं, मूर्ख जिवाच्या या ओढीला काय म्हणावं? दोन्हीं हातांनीं आपलं तोंड फडाफड बडवून घ्यावं इतका तिला स्वतःचा वीट आला. "एकदां माझ्याकडे ये." हे त्याचे शब्द आठवले कीं जणूं गणू तिच्यापुढें उभाच होता असंच समजून ती त्याला म्हणे, "कशाला बोलावतोस माहीतच आहे मला. पण मी आतां पूर्वीची भोळीभाबडी, हिरी राह्यलें नाहीं. मेलें तरी तुझ्याकडे येणार नाहीं..." तीन दिवस ती हें पालुपद घोकीत राहिली...आणि चवथ्या दिवशीं रात्रीं ती त्याच्याकडे गेली!

तिनें पाहिलं तों गणूचा थाट भलताच वाढला होता. पूर्वीं फक्त जिनगर गल्लींतल्या त्या घराचा अर्धाच भाग त्याच्याकडे होता. पण आतां त्या भागापलीकडचा चौक आणि चौकापलीकडचा, मागच्या बोळांत निघणाऱ्या दारापर्यंतचा भाग त्याच्याकडे होता. जिनगर गल्लीच्या बाजूकडल्या भागांत चित्रांचा कारखाना होता, चौकापलीकडे माडीवर त्यानं आपली खोली थाटली होती, व माडीखालच्या पडवीपलीकडे असलेल्या मोठ्या दालनांत जें कांहीं तिला दिसलं तें काय होतं तें तिला प्रथम कळलंच नाहीं. गणूनं जेव्हां तिला सांगितलं तेव्हां ती चपापली. "गणू! ही काय भलतीच बुद्धि झाली तुला?" तिनं कुजबुजत विचारलं.

तो हंसून म्हणाला, " भलतीच बुद्धि कशी म्हणतेस? घबाड मिळविण्याचा धंदा आहे हा. गेल्या तीन महिन्यांत तीन हजार रुपये कमावले मीं. झटपट पैसे देणारी कामधेनु आहे ही."

ती म्हणाली, " अरे, पण सांपडलास कीं तुरुंगांत जाशील."

" हिरे, तूं ल्हान मूल आहेस. तुरुंगांत गरीब माणसं जातात. चांदी फेकून तुरुंगाच्या वाटा बंद करणं ज्यांना सहज शक्य आहे असे श्रीमंत लोक कधीं तुरुंगांत जात नाहींत. मला मदत करशील, तर तुलाहि सोन्यानं मढवून काढीन. या कामधेनूचं दूध मोठमोठ्यांच्या घरीं गुपचुप पोंचवायसाठीं तुझा उत्तम उपयोग होईल मला."

ज्या वस्तूंना उद्देशून गणू ' कामधेनु ' म्हणत होता त्या वस्तूंकडे पाहून हिराच्या जिवाचा थरकांप उडाला. तिच्या लक्षांत हलके हलके सारं आलं. पुढच्या मागच्या दोन्हीं रस्त्यांना लागलेल्या त्या खूप मोठ्या घराच्या जिनगर गल्लीकडल्या दर्शनी भागाकडे पाहिलं तर लोकांना आर्टिस्ट गणपतराव काकड्यांचा चित्रांचा कारखाना दिसत होता. चौकाच्या मागच्या बाजूला चोरून दारू गाळण्याची भट्टी असेल अशी शंका कुणाला येणं शक्यच नव्हतं. मागच्या बोळकंडीकडच्या घराचा भक्कम दरवाजा नेहमीं बंद ठेवतां येत होता, आणि भट्टींत तयार होणारी दारू बाहेर रवाना करण्यापुरता हवा तेव्हां चोरून उघडतां येत होता. दारूबंदीच्या सरकारी धोरणाला पाठिंबा द्यायसाठीं गणपतराव काकड्यांनीं मेणाच्या चित्रांचं सुंदर प्रदर्शन तयार करून सरकारची शाबासकी मिळविली होती. गणपतराव नखशिखांत पांढऱ्या खादीचा पोषाख करीत होते. त्यांच्या चित्रांच्या कारखान्याच्याच इमारतींत मागच्या बाजूस दारूची मोठी चोरटी भट्टी असेल अशी कोणाची कल्पना होणंच शक्य नव्हतं...

हिरा विलक्षण चकित होऊन गप्प उभी राहिली.

गणूनं तिला पुनः विचारलं, " मग काय हिरा, माझं काम करशील ना? सोन्यानं मढवून काढीन तुला."

तिच्या मनांत आलं, अगदीं पक्का मांग आहे हा. यानं माझा घात तर केलाच, पण आतां हा सरकारचा घात करतो आहे. इंदुताईचा नवरा, माझा म्हातारा बाप, यांच्यासारखे कितीक दारूबाज माणसांत आले, त्यांना

परत नरकांत नेऊन टाकण्याचा धंदा करून पैसे मिळवतो आहे हा!... याला चांगला झोडपून डाग देणारं कुणी माणूस नाहीं का?...आणि मग एकदम तिच्या मनांत एक कल्पना आली, आणि तोंडावर लाडिक हसूं आणून ती गणूला म्हणाली, "सोन्यानं मढवून काढशील? खरं म्हणतोस?"

त्यानं तिचा हात धरला व म्हटलं, "वर माडीवर चल."

ती त्याच्याबरोबर माडीवर गेली.

दोन घटकांनीं ती बाहेर पडली. ती सरळ दोन गल्यांपलीकडच्या चौकीवर गेली. ओट्यावर विडी फुंकीत बसलेल्या शिपायापुढं उभं राहून तिनं गणूच्या चोरट्या भट्टीची हकीगत त्याला सांगितली. तिची अशी कल्पना होती कीं ती ऐकल्याबरोबर तो शिपाई म्हणेल, "चल बाई माझ्या-बरोबर, दाखव कुठं आहे ती भट्टी." पण तो पोलीस उलट दटावून राग भरूं लागला. "खोट्या बातम्या दिल्या कीं तुरुंगांत जावं लागतं, माहीत आहे बाई?" तो म्हणाला. हिराला गणूचे शब्द आठवले. 'चांदी फेकून तुरुंगाच्या वाटा बंद करतां येतात' असं कांहींसं तो म्हणाला होता. चौकी-वरचा तो पोलीस दाद घेणार नाहीं अशी खात्री पटल्यावर ती जाऊं लागली. पण त्यानं तिला अडकवून ठेवलं. नाहीं नाहीं ते दरडावणीचे शब्द तो तिला बोलूं लागला, शिव्याहि देऊं लागला. हिरा घाबरून गेली. तिच्या मनांत आलं, सरकार म्हणतं—गुन्ह्याची वर्दी लोकांनीं द्यायला हवी, अन् त्या सरकारचेच हे शिपाई असं वागतात...ती एका कोपऱ्यांत बसून राहिली. काय करावं तिला सुचेना.

पण रात्रीं एक वाजतां एक वरिष्ठ अधिकारी चौकीवर आला. तो आलेला पाहातांच शिपाई चपापला. तो अधिकारी या वेळीं येईल अशी त्याची कल्पना नसावी. हिराकडे पाहून त्या अधिकाऱ्यानें त्याला विचारलं, "या बाई कोण आहेत?" हिरा आपलं धैर्य एकवटून पुढं झाली आणि त्या अधिकाऱ्याला तिनं सारी हकीगत सांगितली.

दुसऱ्या दिवशीं गणूच्या भट्टीवर पोलिसांनीं छापा घातला. भट्टीचं सामान जप्त केलं. गणूला पकडण्यांत आलं.

तिसऱ्या दिवशीं हिराला एका मोठ्या कचेरींत नेण्यांत आलं, व तिथल्या साहेबापुढं उभं करण्यांत आलं. तो सारा प्रकार पाहून ती घाबरून गेली. पण साहेब तिला म्हणाला,

" बाई, घाबरू नका. खुर्चीत बसा. तुम्हांला शाबासकी द्यायसाठीं बोलावून आणलं आहे. तुम्हीं सरकारचं फार मोठं काम केलं आहे. तुमच्यासारख्या बायका... "

पण हिराचं त्याच्या बोलण्याकडे नीटसं लक्ष नव्हतं, तिला वाटत होतं गणूच्या चोरट्या दारूच्या भट्टीची वर्दी आपण सरकारांत कां दिली त्याचं सगळं कारण सांगून टाकावं. तिच्या मनांत दारूचा तिटकारा तर होताच, दारूबंदीचा कायदा तोडल्याबद्दल गणूचा संताप तर तिला आला होताच, खादीचा पोषाख करून अन् प्रदर्शनं मांडून सरकारच्या अन् लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकल्याबद्दल गणूला शिक्षा झाली पाहिजे असं तर तिला वाटलं होतंच. पण याखेरीज सरकारांत तिनं वर्दी दिली, त्याला आणखी एक कारण होतं. गणूनं तिचा गळा कापला होता, त्याला कुणी तरी झोडपून डाग द्यावा असं तिला नेहमीं वाटलं होतं. तिनं त्याच्यावर सूड उगविला होता...तिला वाटलं या साऱ्या गोष्टी साहेबाला सांगाव्या. तिच्या मनांत असंसुद्धां आलं, कीं चोळीची डावी बाही वर करावी आणखी बापानं चार वर्षांपूर्वी जळत्या लाकडाचा डाग दिला त्याचा दंडावर अजूनहि बेलाच्या पानाएवढा काळानिळा वण होता, तो साहेबाला दाखवावा...

पण हिरानं यांपैकीं कांहींच केलं नाहीं !

शाबासकी देऊन झाल्यावर साहेब तिला म्हणाला, " बाई, तुम्ही जा आतां. " तेव्हां ती मुकाट्यानं त्या खोलीच्या बाहेर पडली !

# ११ : शिंपले आणि मोती

" आं ! काय म्हणालीस ? " असं विचारून मीं सुधावहिनीकडे पाहिलं, तेव्हां ती हंसली व कांहीं वेळ गप्पच राहिली.

मग ती म्हणाली, " माझ्या बोलण्याकडे तर तुमचं लक्ष नाहींच, पण इतकं सुंदर जेवण तुमच्यापुढें आहे त्या जेवणाकडेसुद्धां नाहीं. "

तिचं म्हणणं कांहीं खोटं नव्हतं. या हॉटेलांतलं जेवण नेहमींच सुंदर असे म्हणून दर रविवारीं दुपारीं दादा, मी आणि वहिनी या हॉटेलांत जेवायला येत असूं. दादाला कामानिमित्त बाहेर जावं लागल्यामुळें तो नसला तरी मी आणि वहिनी दोघंच येत असूं. आज आमच्याबरोबर दादा नव्हता, आम्ही दोघंच होतों. परंतु हॉटेलचे मॅनेजर दादाच्या विशेष ओळखींतले असल्यामुळें त्यांनीं नेहमींप्रमाणें आमची उत्तम बडदास्त ठेवली होती. जेवण उत्तम होतं यांत शंकाच नाहीं. पण त्याकडे माझं लक्ष नव्हतं यांतहि शंका नाहीं. मीं वहिनीला म्हटलं,

" तूं म्हणतेस तें बरोबर आहे. "

ती म्हणाली, " आतांशा मी पाहतें तुम्ही फार वेळां एकदम मनाशीं सचिंत होऊन बसल्यासारखे बसतां. "

मीं म्हटलं, " होय ? इतरांच्या लक्षांत यावा इतक्या थराला माझा सचिंतपणा गेलाय ? "

" तर ! तुम्हांला शंका आहे कीं काय ? कसल्या फिकिरींत आहांत एवढे ? सांगा तरी मला. "

मीं म्हटलं, " वहिनी, बरं झालं विचारलंस. कारण कुणाला तरी विश्वासांत घेतल्याशिवाय संकटांतून सुटण्याचा मार्ग मला दिसणार नाहीं, असं आतां मला वाटायला लागलंय आणि माझं संकट असं आहे, कीं दादापेक्षां तुझाच उपयोग मला जास्ती होईल. "

" कसल्या संकटांत सांपडलां आहांत एवढे ? "

" फार वाईट संकटांत. वैऱ्यावरसुद्धां असा प्रसंग येऊं नये. "

तिचा चेहरा अगदीं भयभीत झाला. तिच्या तोंडांत खव्याच्या करंजीचा घास होता, पण तिची चर्वणक्रिया थांबली. " अगबाई ! " असा उद्‌गार तिच्या भरल्या तोंडांतून बाहेर पडला आणि मग घांस गिळून तोंड मोकळं करून तिनं विचारलं, " मला सांगा तरी ! "

मीं म्हटलं, " वहिनी, अशी कल्पना कर कीं तूं एक पुरुष आहेस. "

" हं—"

" चांगली देखणी—नाहीं म्हणजे चांगला देखणा पुरुष—"

" हं—"

" एका ऑफिसांत तुला चांगला मोठा पगार आहे. शरीरानं धडधाकड आहेस. वयानं तरुण आहेस, थोडक्यांत सांगायचं तर लग्नाला अगदीं झालेली—नाहीं झालेला—असा लग्नाच्या बाजारांतला एक अत्यंत आकर्षक माल आहेस आणि तुला पटकावायला कित्येक पोरी टपलेल्या आहेत. "

वहिनी थोडीशी हंसली व म्हणाली, " मग यांत चिंतेचं कारण काय ? "

मीं म्हटलं, " सांगतों, सांगतों. दमानं घे. पुढें अशी कल्पना कर, कीं ज्या पोरी तुझ्यावर टपलेल्या आहेत त्या सगळ्या काळ्यासावळ्या, नकट्या, हडकुळ्या तरी किंवा लठ्ठ तरी आहेत आणि साऱ्या एकजात निर्बुद्ध आहेत. "

ती म्हणाली, " तरी अजून मला कळत नाहीं, तुम्हीं नेहमीं चिंतेंत कां असावं ? या साऱ्या पोरींना झिडकारून मोकळं होणं काय अवघड आहे ? "

" वहिनी ! " मीं म्हटलं, " तुझ्या तोंडावर मला म्हणावं लागतंय मला माफ कर. पण स्त्रीजात झिडकारायला सोपी नाहीं. गुळाच्या खड्या-वर बसलेल्या माशा एक वेळ पंख्याच्या एका फटकाऱ्यानं हांकून देतां येतील, पण लग्नाच्या आशेनं तरुण पुरुषाला चिकटूं पाहणाऱ्या पोरींपासून स्वतःची सुटका करून घेणं मुष्कील आहे ! फार मुष्कील आहे ! "

मी गप्प झालों. पण मी पुढें आणखी बोलणार आहें असं दर्शविणारी माझी चर्या झाली असली पाहिजे. म्हणून सुधावहिनी म्हणाली, " हं ? "

मीं म्हटलं, " अन् त्यांतल्या त्यांत नीरा अशी आहे कीं ती एकदां—"

भलतंच कांहींतरी ऐकल्याप्रमाणें सुधावहिनीनं चर्या केली आणि म्हटलं, " म्हणजे ? भाऊजी, तुम्ही नीरा घ्यायला लागलांत कीं काय ? "

मला माझ्या त्या सचिंत अवस्थेंत देखील हंसू आलं आणि मीं म्हटलं, " छे छे वहिनी. त्या प्यायच्या नीरेबद्दल मी बोलत नव्हतों. मी तुला अगदीं शपथपूर्वक सांगतों कीं एक वेळ जें पिऊं नये तें पिईन पण नीरा नाहीं पिणार. ज्या नीराबद्दल मला तुझ्याशीं बोलायचं आहे ती बाटलींतली नाहीं, साडींतली आहे. "

" म्हणजे मुलगी आहे ? "

" बरोबर आहे. "

" अन् ती तुमच्या नादीं लागली आहे ? "

" राइट. "

" आणि ती कांहीं केल्या तुमचा नाद सोडीत नाहीं ? "

" यस्. राइट. "

" आणि म्हणून तुम्ही आतांशा सचिंत आहांत ? "

" अगदीं बरोबर. पण माझ्या संकटाची पूर्ण कल्पना मीं तुला अजून दिलेली नाहीं. माझ्या दैवानं मोठा घात केलाय, तो असा कीं ती आमच्या कचेरींतच नोकरीला आहे. अन् आमच्या बॉसवर तिच्या बापाचं, म्हणजे पर्यायानं तिचहि फार वजन आहे. त्यामुळें तिच्याशीं उघड सामना करून मी तिला दुखवूं शकत नाहीं. "

माझ्या संकटाची थोडी थोडी कल्पना येत चालल्याप्रमाणें वहिनी म्हणाली, " अस्सं ! "

मी पुढें सांगूं लागलों, " आमच्या कचेरींतच ती असल्यामुळें पन्नास वेळां कांहीं तरी निमित्त काढून माझ्याजवळ ती येते, टेबलावर दोन्ही हात ठेवून माझ्या डोक्याला डोकं लागेपर्यंत वांकते आणि माझ्याशीं कुजबुजत राहते. ' मिस् चौधरी, मी कामांत आहे, प्लीज. ' असं कितीदां म्हटलं तरी ती जुमानत नाहीं. किती वेळां तरी दुपारच्या लंचसाठीं ' कॉर्नेलियांत ' तिला घेऊन जाणं मला भाग पडतं आणि दर वेळेस सहा सात रुपयांचा खिशाला चट्टा बसतो. तिला चहा पाणी द्यावं लागतं. ऑफिसांतून मी निघालों, कीं ती म्हणते, चला मलाहि तुमच्याच बसनं यायचं आहे. कधींमधीं

पावडरची डबी संपली, लिप्स्टिक सरली, अशीं गाऱ्हाणीं ती माझ्याकडे अशा आविर्भावानं आणते कीं जणूं या वस्तूंचा तिला पुरवठा करणं ही माझीच जबाबदारी आहे, आणि मग खिशाला पुन्हां चाट लावून घेतल्याशिवाय मला दुसरा मार्ग राहात नाहीं—"

सुधावहिनी म्हणाली, " म्हणजे तुमच्या खिशाला एक चांगलंच भोंक पडलंय म्हणायचं ? "

मीं म्हटलं, " त्या भोंकाचं कांहीं नाहीं. गैरसमज करून घेऊं नकोस. पैसे जातात याची नाहीं मला खरी चिंता. "

" मग ? "

" आतांशा नीरा माझ्या मागं लागली आहे लग्न करा म्हणून. त्यामुळें मी बेचैन होऊन गेलों आहे. "

वहिनी म्हणाली, " तिचं तुमच्यावर एवढं प्रेम आहे तर तुम्ही लग्न करून कां नाहीं टाकत तिच्याशीं ? "

मीं अंगाला शहारे देऊन म्हटलं, " तिच्याशीं ? त्यापेक्षां मला आत्महत्त्या करायला कां नाहीं सांगत तूं ? "

" असं काय भलतं बोलतां हो ? "

मीं आवेशानं म्हटलं, " वहिनी, तूंच एकदां कधीं तरी तिला डोळे भरून बघ आणि मग मला काय तें सांग. "

" इतकी वाईट आहे ती दिसायला ? मला नाहीं खरं वाटत. "

" हें बघ वहिनी, तुम्हा बायकांच्या दृष्टीनं एक देखील स्त्री कुरूप नसते. अगदीं अष्टवक्रा कुब्जा दिसली तरी तुम्ही म्हणणार दहाजणींसारखी आहे. अन् तें कांहीं खोटं नाहीं म्हणा. अकरा बायकांतल्या दहाजणी खरोखरी कुब्जाच असतात. पण नीराकडे तूं एकदां पुरुषाच्या दृष्टीनं बघच, आणखी मग सांग मला तिच्या म्हणण्याला रुकार कसा देऊं तें. "

वहिनी कांहीं वेळ अगदीं विचारांत गढल्यासारखी बसली. नंतर ती म्हणाली, " तुम्ही तिला एकदां स्पष्ट सांगून कां नाहीं टाकीत कीं तुझंमाझं लग्न होणं शक्य नाहीं. "

" अग, पण तिला सबब काय सांगूं ? तूं कुरूप आहेस असं तिच्या तोंडावर सांगितलं असतं, पण स्त्रीदाक्षिण्य आडवं येतं. तूं गरीब आहेस

असं म्हणायची सोय नाहीं, कारण ती श्रीमंताची लेक आहे. तूं मूर्ख आहेस असं तरी तिला कसं सांगूं ? म्हणून कोणती सबब सांगितली असतां तिला पटेल आणि माझ्या मानेभोंवतीं पडलेला हा पाश एकदांचा सुटेल, या चिंतेंत मी आतांशा आहें. आतां तुला विश्वासांत घेऊन विचारतों, मला कांहीं तरी नामी सबब सांग. सबब ! सबब ! "

ती पुन्हां विचारांत गढून गेली. त्यामुळेंच कीं काय ती भराभर करंज्यांचे घांस घेऊं लागली. तिच्या प्रत्येक घांसाच्या वेळेस मला आशा वाटत होती, आतां हा घांस संपला कीं ती माझ्याशीं बोलेल...पण करंज्या संपल्या, मागचा भात आटपला. अखेरची कढीची वाटी रिकामी झाली. आणि मग पाहतों तों जांभई देऊन ती म्हणाली, " फार जेवण झालं बाई. सुस्ती आलीय. "

म्हणजे माझ्या संकटाचा ती मनांत विचार करीत होती अशी मीं उगीचच कल्पना केली होती तर !...कदाचित् माझी हकीगत वहिनी जेवणावर ताव मारण्याच्या नादांत विसरूनहि गेली असेल... मीं मनाशीं विचार केला, हिच्याकडून मार्गदर्शनाची अपेक्षा करण्यांत कांहीं अर्थ नाहीं...आपल्या संकटांतून आपणच मार्ग काढला पाहिजे. नीरा माझा नाद सोडील अशी एखादी जाम सबब आपली आपणच शोधून काढायला हवी...... सबब ! सबब !

आमचं जेवण आटपलं—म्हणजे वहिनीचं जेवण आटपलं. वेटरनं आणून ठेवलेल्या खोट्या चांदीच्या पंचपाळ्यांतील भाजलेली सुपारी, बडीशेप वगैरे मसाला चांगला मूठभर तोंडांत कोंबीत वहिनी म्हणाली, " हं, जाऊं या आतां. "

माझ्या मनांत आलं, परदुःख शीतल हेंच खरं. मीं म्हटलं, " हं, जाऊं या. "

ती म्हणाली, " घरीं मुलांनीं काय गोंधळ घातलाय कुणास ठाऊक ! "

तिचा पांच वर्षांचा अजय आणि दोन वर्षांची सुमी यांना नेहमींप्रमाणे मोलकरणीच्या स्वाधीन करून आम्ही आलों होतों. तीं दोघं काय गोंधळ करणार ? मजेंत असतील. फार तर पुन्हा पुन्हा रडून मोलकरणीजवळ देऊन ठेवलेला चाकलेटचा डबा त्यांनीं रिकामा करून टाकला असेल. पण

वहिनीला त्यांच्या गोंधळाची काळजी होती. प्रत्यक्ष दीराच्या आयुष्याचा गोंधळ होणार याचं तिला कांहीं वाटत नव्हतं!...ठीक आहे. माझा मीं मार्ग काढायला हवा होता. ...सब्र! सब्र! असं मनाशीं घोकीत मी तिला घेऊन स्पेशल फॅमिली रूममधून बाहेर पडलों.

दाराशीं वजन करण्याचं यंत्र होतं. वहिनीला नेहमींप्रमाणें वजन करायची लहर आली. प्रत्येक रविवारच्या भोजनानंतर तिचा हा कार्यक्रम ठरलेला होता. यंत्रांतून बाहेर पडणाऱ्या कार्डावरच्या वजनाच्या आंकड्यापेक्षां त्याच्यामागं छापलेलं भविष्य पाहण्याची तिला फार हौस होती. "आपल्या प्रेमांतल्या माणसापासून सावध रहा." "लौकरच तुम्हांला लांबचा प्रवास घडणार आहे." "तुमच्या आयुष्यांत खळबळ करून सोडणाऱ्या गोष्टीची अपेक्षा करायला हरकत नाहीं," अशा अनेक भविष्यांच्या चिठ्या तिनं घरीं एका पेटींत जमवून ठेवल्या होत्या. एकदां तर तिच्या वजनाच्या कार्डावर भविष्य आलं होतं, "तुमच्या मनाजोगा जोडीदार तुमच्या शोधांत आहे. बाहू उंच करून त्याचं स्वागत करा." पण तरी देखील या भविष्यांचा तिचा नाद सुटला नव्हता...ती म्हणाली, "मी वजन करतें."

मीं म्हटलं, "खुशाल." आणि तिचं वजन होईपर्यंत मी हॉटेलच्या दाराकडे तोंड फिरवून उभा राहिलों.

आणि समोरून माझं संकट मूर्तिमंत येतांना मला दिसलं!

नीरा दुरूनच माझ्याकडे पाहून हंसली.

मीहि कदाचित् हंसलों असेन.

ती एकटीच होती असं दिसलं.

ती दारांतून आंत शिरली. घामानं ओली झालेली चेहऱ्यावरची पावडर पुशीत तिनं मला विचारलं, "जेवण झालं कीं व्हायचं आहे?"

मीं म्हटलं, "झालंय! आतां घरीं निघालों."

तितक्यांत वहिनीचं वजन झालं आणि तिनं माझ्या कोटाची बाही ओढून म्हटलं, "पाहिलंत का?" तिनं माझ्या हातांत वजनाची जाड चिठी दिली.

नीरानं तिच्याकडे पाहिलं, नंतर माझ्याकडे पाहिलं.

त्याच क्षणीं एक विलक्षण मौलिक कल्पना माझ्या डोक्यांत चमकली!

वहिनीकडे नजर टाकीत मीं नीराला म्हटलं, " यांची ओळख करून देतों. या मिसेस शिंपले."

तें ऐकतांच नीरा चांगलीच चमकली हें वहिनीच्या कदाचित् लक्षांत आलं नसेल, पण माझ्या लक्षांत आलं. मला अधिक हुरूप आला.

नीरा म्हणाली, " नुसतं आडनांव काय सांगतां? नांव सांगा कीं! का लाज वाटते?"

मीं म्हटलं, " छे, छे! सुधा!"

" बरं झालं बाई! ओळख झाली." अशी प्रस्तावना करून नीरा सुधावहिनीशीं बोलत राहणार अशी मला शंका आल्याबरोबर मीं सुधा-वहिनीचा हात धरून तिला ओढीत म्हटलं, " हं, चल चल. घरीं लौकर जायला पाहिजे. मुलांनीं गोंधळ घातला असेल असं तूंच म्हणालीस ना? चल, आटप."

मुलांचा अनेकवचनी उल्लेख ऐकल्यावर नीराचा चेहरा कसा झाला तें माझ्या पाठीला डोळे नसल्यामुळें मला दिसलं नाहीं. घरीं जातां जातां वहिनीनं मला विचारलं, " ही बाई काय मला तुमची बायको समजली कीं काय?"

मीं हंसून म्हटलं, " हं. असं दिसतंय्. दीडशहाणीच आहे म्हणायची."

" कोण ही बाई? काय तिचं रूप, काय तिचा अवतार! कोण हो ती?"

" मीं कुठें धड ओळखली तिला? पण जाऊं दे तो विषय. कुणी का असेना."

ती नीरा चौधरी होती हें वहिनीला मीं एरवीं सांगितलं असतं; पण माझ्या संकटांतून मार्ग काढण्यांत मला मदत करण्याऐवजीं तिनं खव्याच्या करंज्यांवर हात मारला होता याबद्दल मला तिचा राग आलेला होता. मी तिला क्षमा करूं शकत नव्हतों. मला एक मौलिक कल्पना अचानकपणें सुचली होती आणि तिचा उपयोग मीं केला होता. या कल्पनेचा कॉपीराईट माझ्याकडे होता. जी भेटली तीच नीरा चौधरी ही गोष्ट वहिनीला सांगायची माझी इच्छा नव्हती.

माझ्या मौलिक कल्पनेच्या प्रयोगाला दुसऱ्या दिवसापासूनच फळं आलेलीं मला दिसूं लागलीं. ऑफिसच्या वेळांत नीरा माझ्याकडे येईनाशी

झाली. तिला लंचसाठीं बाहेर घेऊन जाण्याचे प्रसंग बंद झाले. तिच्या पॉवडर, लिपस्टिकच्या बाबतींत माझ्याकडे 'सप्लाय ऑफिसर'ची भूमिका बरेच दिवस होती ती देखील गेली. आमच्या कचेरींतल्या दुसऱ्या एका लग्नाला झालेल्या तरुण पुरुषाकडे नीरानं आपला मोर्चा वळविल्याचं हलके हलके माझ्या लक्षांत आलं. मीं सुटकेचा निश्वास टाकला. ईश्वर तिचं भलं करो असा मनांत आशीर्वाद दिला. हो, तिच्याशीं माझं वैय्यक्तिक भांडण थोडंच होतं? माझ्या बाबतींत तिची कटकट संपली. मी पुन्हां माझ्या ब्रह्मचर्याश्रमांत सुखानं कालक्रमण करूं लागलों. माझं लग्न झालेलं आहे आणि मला दोन मुलंसुद्धां आहेत अशी नीराची कायमची समजूत झाली असली तरी मला त्याची फिकीर नव्हती. मला माझी शांतता हवी होती व ती मला मिळाली होती. मी अगदीं मजेंत दिवस घालवूं लागलों.

परंतु माझं सुख दैवाला पाहवलं नाहीं. एके दिवशीं माझ्या निश्चित अवस्थेवर दैवानं एकदम बॉंब टाकला.

मी आमच्या क्लबाच्या टेनिस कोर्टांत खेळायसाठीं हातांत रॅकेट घेऊन उतरलों. तितक्यांत कुणीतरी माझ्याजवळ येऊन म्हणालं, "वसंतराव, तुम्ही मिक्स्ड डबल्सची गेम खेळणार आहांत ना? हिला पार्टनर घेऊन खेळा. ही फार चांगली खेळते. अहमदाबादेहून इथें बदली होऊन आलेल्या डॉ. मोहित्यांची ही मुलगी. हिचं नांव मोती. तुम्ही शिंपले, ही मोती! चांगली जोडी जमली."

त्या गृहस्थाच्या त्या कोटीनं मी हंसलों आणि त्या मुलीकडे पहातच राहिलों. ती खेळण्यांत कितपत पटाईत होती कोण जाणे; पण ती विलक्षण देखणी होती खचित. आणि इतकी देखणी मुलगी अचानक एके दिवशीं पार्टनर म्हणून माझ्या पदरांत येऊन पडत होती. ईश्वराची करणी अगाध खरी! हो. आतां हेंच पहा ना. माझ्या ध्यानीं मनीं नसतांना ही स्वरूप-सुंदर जोडीदारीण टेनिसच्या डावापुरती कां होईना, पण मला मिळत होती! ती आणि मी मिळून खेळणार होतों!

नंतर खेळूं लागल्यावर मला दिसून आलं कीं ती खेळण्यांतहि पटाईत होती. माझ्यापेक्षांदेखील ती अधिक चांगली खेळणारी होती. आम्हीं दोघांनीं मिळून आमच्या प्रतिस्पर्ध्यांना अगदीं सहज लीलेनं चीत करून टाकलं.

डाव संपल्यावर ती मला म्हणाली, " थँक यू पार्टनर. " तिच्याशीं एकदम एकेरी नांव घेऊन मराठींत कसं बोलावं असं मनांत आल्यामुळें मी इंग्रजींत तिचे आभार मानले आणि तिच्या खेळण्याची स्तुति केली. इंग्रजी भाषा फार सोईची. ' तूं ' आणि ' तुम्ही ' यांपैकीं कोणता प्रयोग आपण करीत आहोंत तें ऐकणाऱ्याला कळत नाहीं. ऐकणाऱ्यानं आपल्या इच्छेप्रमाणं अर्थ घ्यावा.

पण मोतीची आणि माझी खेळण्याच्या वेळेस रोज संध्याकाळीं गांठ पडूं लागली. बहुतेक रोजच आम्ही मिळून खेळूं लागलों. आणि मग इंग्रजी भाषेच्या बुरख्याचं मला काम उरलं नाहीं. खुशाल एकेरी हांक मारून मी तिच्याशीं मराठींत बोलूं लागलों. " आज तूं भारी चांगली खेळलीस ! " " किती पटाईत आहेस तूं ! " असे एकेरी गोड गोड शब्दप्रयोग मला करतां येऊं लागले. माझ्या प्रकृतीच्या अनेक तक्रारी देखील उत्पन्न होऊं लागल्या आणि डॉ. मोहित्यांचंच औषध पाहिजे असं माझी तब्येत म्हणूं लागली...मी मोतीच्या प्रेमांत सांपडलों हें काय आतां निराळं सांगायला हवं ?

तिला घेऊन मी हिंडूं फिरूं लागलों. हॉटेलांत जेवायला जायला लागलों. कधीं कधीं समुद्रांत पोहायसाठीं जुहूवर देखील जाऊं लागलों...प्रेमाच्या मार्गावरचा माझा प्रवास अगदीं निर्वेध चालला होता. अखेरचा मुक्काम कांहीं फारसा दूर नाहीं असं मला वाटूं लागलं.

एक दिवस रात्रीं मी आणि वहिनी सिनेमाला जाण्यासाठीं निघालों. दादा दुसरीकडे गेला होता. पण तो आणि त्याचा एक स्नेही सिनेमाच्या दारावर आम्हांला भेटणार होता. चार जागा आधींच रिझर्व केलेल्या होत्या. तिकिटं माझ्या खिशांत होतीं. ठरल्याप्रमाणें मी आणि वहिनी थिएटरच्या प्रवेशद्वारांत उभं राहून दादाची व त्याच्या मित्रांची वाट पाहूं लागलों. पण शो सुरू होण्याची घंटा झाली तरी दादाचा पत्ता नाहीं. वहिनी आणि मी चुळबुळ करीत उभीं राहिलों. लोक भराभर आंत जात होते. चित्रपट फारच गाजलेला असल्यामुळें सारीं तिकिटं खलास झालीं होतीं. आयत्या वेळीं येणारे लोक निराश होऊन परत जात होते. वहिनी दर दोन सेकंदांनीं घोकीत होती, " यांचं हें नेहमींचंच असं आहे. " मी तिला धीर देत होतों, " येईल ग, आतां येईल ! " शेवटीं ज्या मित्राच्या घरीं दादा जेवायला

गेला होता, तिथें मीं त्याला टेलिफोन केला तेव्हां त्यानं सांगितलं, कीं "इथें जेवायसाटीं जमलेल्या मंडळींनीं निराळाच बेत केला आहे. एका बाईचं गाणं ठरवलंय त्यांनीं. तिकडे आम्ही सगळे जाणार आहोंत. मी येऊं शकत नाहीं सिनेमाला. तुम्ही दोघं पहा आणि उद्यां मला सांगा कसा काय आहे तो."

मीं रागानं म्हटलं, "अन् दोन तिकिटांचं काय करूं?"

तो म्हणाला, "परत कर कीं. एवढी काय मोटी त्याची पंचाईत?"

"तें माहीत आहे रे मला." असं म्हणून मी थाड्दिशीं टेलिफोन बंद केला.

मी आणि वहिनी तिकिटं परत करण्यासाठीं खिडकीजवळ जाऊं लागलों, तों तिथें नीरा आणि मोती हातांत हात घालून रडव्या तोंडांनीं उभ्या असलेल्या आम्हांला दिसल्या!

मीं मोतीला विचारलं, "काय ग, काय झालं?"

ती म्हणाली, "व्हायचं काय? आम्हांला तिकिटं मिळत नाहींत आणि परत जायची वेळ आलेली आहे."

मीं म्हटलं, "होय? कितीजणी आहांत तुम्ही?"

"मी आणि ही नीरा. अन् आमच्या दोघी मैत्रिणी तिथं उभ्या आहेत. त्या पहा."

मीं म्हटलं, "मी तुम्हांला दोन तिकिटं देऊं शकेन."

नीरा म्हणाली, "दोहोंनीं काय होणार? आम्ही चौघीजणी आहोंत नं?"

मीं म्हटलं, "चार तिकिटं नाहींत बुवा आपल्याजवळ. सॉरी."

तितक्यांत वहिनी मला म्हणाली, "देऊन टाका चारीं तिकिटं. आपण आदितवारीं पाहूं हा चित्रपट."

ती अगदीं रागांत होती. तिच्याशीं कांहीं वाद करणं त्या वेळेस शक्य नव्हतं. मीं चारी तिकिटं मोतीच्या हातावर ठेवलीं. ती पैसे द्यायला लागली तेव्हां "असूं दे, असूं दे" म्हणून मीं ते घेतले नाहींत. आणि वहिनीकडे वळून मीं म्हटलं, "चल."

मोती म्हणाली, "तुमचं चित्रपट पाहणं आम्ही बुडवितों आहोंत हें कांहीं बरं नाहीं वाटत."

मीं म्हटलं, " शी ! त्यांत काय मोठंसं ? आम्ही रविवारीं येऊं. "

तितक्यांत वहिनी जरा दूरच गेली होती ती ओरडून म्हणाली, " हं चला. " " चला. " म्हणून मी दूर होऊं लागलों.

मोतीनं आपल्या मैत्रिणींना " या ग या. मिळालीं तिकिटं " असं म्हणून बोलावलं. त्या चौघी मिळून आंत जाऊं लागल्या. मी मोतीकडे हंसत साभिप्राय पाहण्याची संधि बघत होतों. तितक्यांत नीरा मला म्हणाली, " काय महाराज ? ओळख अजिबात विसरलांत वाटतं ? "

मीं म्हटलं, " वा ! विसरेन कसा ? "

तिनं एकदम विचारलं, " आजहि मुलांना घरीं ठेवून आलांत वाटतं ? "

मी कांहीं उत्तर देणार तोंच पुढें गेलेल्या आपल्या तिघी मैत्रिणींना गांठायसाठीं ती धांवत गेली.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं टेनिसचा डाव आटपल्यानंतर मीं मोतीला म्हटलं, " एखाद्या चांगल्या हॉटेलांत जाऊं या काय ? "

ती म्हणाली, " अं हं. नको. मला लौकर घरीं गेलं पाहिजे. "

तिची चर्या अगदीं बिलकुल नाराज दिसली. मीं म्हटलं, " चल कीं ! असं काय करतेस ? "

ती म्हणाली, " नो, सॉरी. " आणि रॅकेट उचलून ती निघून गेली.

माझ्याशीं वागण्याची तिची प्रेमळ लाडिक तऱ्हा अजिबात बदलल्याचं माझ्या उत्तरोत्तर लक्षांत यावयाला लागलं. माझी जोडीदारीण म्हणून खेळण्याचंहि ती टाळूं लागली. काय बिनसलंय मला कांहीं कळेना. मीं तिला एकदोनदां हळूंच विचारून पाहिलं, तर ती म्हणाली, " कांहीं नाहीं. "

मीं तिचा हात धरून म्हटलं, " तरी पण ? "

तिनं माझा हात एकदम झिडकारून टाकला आणि म्हटलं, " तुमच्या-सारखे पुरुष मला मुळींच आवडत नाहींत. "

अरेच्या ! माझ्यासारखे पुरुष ? म्हणजे मीं काय केलं बुवा ? मी तिला म्हणणार होतों—

पण ती माझ्यापासून एकदम उठून गेली आणि तिचा बाप पत्ते खेळत बसला होता त्याच्या मागच्या बाजूस खुर्ची घेऊन बसली.

आमच्या क्लबच्या टूर्नामेंटस् आल्या, तेव्हां मीं तिला म्हटलं, " मोती, तुझी माझी जोडी हं. "

ती म्हणाली, " सॉरी. मी माझा पार्टनर आधींच निवडलाय. "

मला अगदीं थोबाडींत मारल्यासारखं झालं. मी आणि ती जोडीनं खेळूं आणि चँपियनशिप मिळवूं अशी फार आशा मीं बाळगली होती. मीं म्हटलं, " मला नाहीं खरं वाटत ! "

ती म्हणाली, " ऑफिसांत जाऊन पहा माझी एन्ट्री म्हणजे खात्री होईल तुमची. "

मीं ऑफिसांत जाऊन पाहिलं. मिस मोती मोहिते आणि कोठावाला— अशी एन्ट्री तिनं खरोखरीच दिली होती.

मीं मग सिंगल्समध्येंसुद्धां नांव दिलं नाहीं. मनाशीं एवढंच म्हटलं, " कोठावाला ! काय पण पार्टनर घेतलाय ! पहिल्याच राऊंडमध्यें मार खातील तेव्हां मोतीचे डोळे उघडतील ! "

पण तिच्याऐवजीं माझे डोळे उघडले.

तिनं बायकांच्या सिंगल्समध्यें आणि डबल्समध्यें तर चँपियनशिप मिळविलीच, पण कोठावालाबरोबर खेळून मिक्स्ड् डबल्सची देखील मिळविली.

मी मनाशीं अगदीं खूप जळफळलों. आणि मोतीचं मीं कोणतं घोडं मारलं होतं तें मला कांहीं केल्या कळेना, म्हणून तर जास्तच जळफळलों.

बक्षीस समारंभाला मी हजर राहाणार नव्हतों. पण दादाच्या अध्यक्षतेखालीं समारंभ होणार होता आणि त्याची बायको म्हणून सुधावहिनी बक्षीसं वाटणार होती. तीं दोघं मला सोडीनात. त्यांच्याबरोबर जाणं मला भागच पडलं.

समारंभाच्या वेळेस दादाचं भाषण झालं. त्यानं आपल्या भाषणांत मोती मोहितेची खूप स्तुति केली. " डॉ. मोहित्यांची मुलगी म्हणजे या क्लबाला एक भूषण मिळालेलं आहे. " असं त्यानं म्हटल्याबरोबर लोकांनीं खूप टाळ्या वाजवल्या. मीं मोतीकडे पाहिलं. तिच्या चर्येवर मला आनंद दिसला नाहीं. कसल्या तरी मोठ्या गोंधळांत पडल्याप्रमाणें तिची चर्या दिसली.

माझ्याकडे, दादाकडे, आणि दादाच्या शेजारीं खुर्चीवर बसलेल्या वहिनीकडे ती सारखी पहात होती असं मला वाटलं.

तिचं नांव चिटणिसांनीं घेतलं. ती उठली. व्यासपीठावर गेली. चांदीचे दोन मोठाले पेले आणि एक मोठी ढाल तिनं हातीं घेतली. हंसून सगळ्यांना नमस्कार केला. आणि खालीं उतरल्यावर स्वतःच्या जागेकडे न जातां माझ्याजवळ येऊन अगदीं माझ्या कानांत ती म्हणाली,

" तुमच्याशीं फार महत्त्वाचं काम आहे. "

मीं आश्चर्यानं विचारलं, " माझ्याशीं ? "

तिनं फक्त हंसून मान हलविली आणि मागोमाग येण्याविषयीं मला डोळ्यानं खूण करून हॉलमधून बाहेर गेली.

मी उठलों आणि तिच्या मागोमाग गेलों.

टेनिसच्या रॅकेट्स ठेवण्याच्या छोट्या खोलींत ती शिरली. मी आंत गेलों.

तिनं हातांतले पेले आणि ढाल दूर ठेवली आणि एकदम माझ्या गळ्याभोंवतीं हात टाकून ती म्हणाली, " तुम्ही मला क्षमा केली पाहिजे. "

माझे हात अर्थातच तिच्याभोंवतीं पडले. मीं तिला विचारलं, " कशाबद्दल ? "

" मीं तुमच्याबद्दल वाईट गैरसमज करून घेतला होता. अन् त्या गैरसमजामुळें तुमच्याशीं संबंध ठेवायचा नाहीं असं मीं ठरविलं होतं. "

" गैरसमज ? "

" तुमचं लग्न झालेलं आहे अन् तुम्हांला दोन मुलं आहेत अशी माझी समजूत झालेली होती. आणि त्यामुळें तुम्ही केवळ गंमतीचा खेळ करण्यासाठीं मला नादीं लावीत आहांत असं मला वाटत होतं आणि तुमचा अगदीं तिटकारा आला होता. तुमच्या भावाच्या बायकोलाच मी तुमची बायको समजत होतें. "

" शाबास ! "

" नीरा चौधरीनं माझी तशी समजूत करून दिली होती. त्या दिवशीं थिएटरवर तुम्ही दोघं मला भेटलांत ना—"

मी मोठ्यांदा हंसलों आणि म्हटलं, " किती वेडी ग तूं मोती ! मला विचारायचंस तरी ? आपला गैरसमज मला सांगायचास तरी ? "

ती म्हणाली, " माझा समज खोटा असेल अशी मुळीं मला शंकाच नव्हती. मग सांगूं काय, आणि विचारूं काय ? "

" पण आतां तरी तुझा गैरसमज पुरता गेला का ? "

माझ्या प्रश्नाचं उत्तर देण्याऐवजीं ती मला म्हणाली, " माझं तुमच्यावर फार प्रेम आहे ! "

मीं म्हटलं, " मला माहीत नाहीं काय ? "

ती म्हणाली, " मिक्स्ड डबल्सची चँपियनशिप मीं मिळवली याचा मला मुळीं आनंद होत नाहीं. तो पेला मी फेंकून देणार आहें. "

" वा ग वा ! शहाणीच आहेस. "

" खोटं नाहीं सांगत, तुम्हांला जोडीदार घ्यायला हवं होतं मी. "

मी तिची हनुवटी हळूंच वर उचलली आणि म्हटलं, " मग अजून वेळ गेली आहे कीं काय ? मी जोडीदार म्हणून तुला हवा ना ? "

तिनं एकदम मान खालीं केली आणि माझ्या छातीवर डोकं टेकलं. मी तिचा मुका घेणार होतों—

पण तितक्यांत कुणीतरी त्या खोलींत आलं आणि बटण ओढून दिवा लावला, त्याबरोबर मोती माझ्यापासून दूर झाली आणि खोलीबाहेर पळाली.

तिचे पेले आणि ढाल उचलून खोलीबाहेर पडत मी ओरडलों, " हीं सारीं बक्षिसं राहिलीं ना ? "

ती बरीच दूर गेली होती तेथून ती ओरडली, " तीं ठेवा तुमच्याजवळ. त्यांच्याहून मोठं मला हवं तें बक्षीस मला मिळालंय ! "

## ११ : " म्हणाला उघडा दरवाजा. "

" पाहिली का कुठें तरी
प्रीत ऐशी जगावरी..."

मिशन हॉस्पिटलच्या जनरल वॉर्डांत सकाळची प्रार्थना चालू होती. हॉस्पिटलची मेट्रन मिसेस हॉप्किन, नर्सेसवरची सुपरिंटेंडंट शेफरबाई, ब्रदर्स, नर्सेस, वॉर्ड आया, वॉर्ड बॉईज, ड्यूटीवर हजर असलेल्या साऱ्यांनीं मिळून जनरल वॉर्डांत जमायचं आणि प्रभू येशूचं स्तवनगीत गायचं अशी या हॉस्पिटलांत पद्धत होती. सर्वच मिशन हॉस्पिटलांतून ती असते. मात्र हें गीत मराठींत असलं तरी तें इंग्रजी गाण्याच्या चालीवर म्हटलं जात होतं. तेव्हां तें एकसुरानं म्हणण्याचा प्रश्न नव्हता. अनेक सूर लावून ज्यामध्यें ' हार्मनी ' प्रामुख्यानें साधतात तें इंग्रजी संगीत. तेव्हां कुणालाही तें गातांना बेधडक बेसूर होण्याची मुभा असते. आतां हें गीत गातांना तर प्रत्येकानं आपला सूर काढून गाण्यास सुरवात केली होती. मराठी गीताची इंग्रजी हार्मनी साऱ्या वॉर्डांत घुमली होती. हॉस्पिटलच्या आवारांतच खास डॉक्टरांसाठीं बांधलेल्या छोट्या खोल्यांपैकीं एका खोलींत आरशासमोर पोषाख करीत उभ्या राहिलेल्या डॉक्टर रतन मुकादमच्या कानांपर्यंत त्या गीताचे स्वर पोचत होते. हॉस्पिटलचा पांढरा शुभ्र गणवेष चढवितांना आणि गळ्याभोंवतीं स्टेथॉस्कोपची नळी बसवितांना रतन गुणगुणत होता...
" पाहिली का कुठें तरी, प्रीत ऐशी जगावरी, पाहिली का...? "

शेवटच्या दोन शब्दांवर उंच टीप घेऊन सारे आवाज थांबले. रतन कान टवकारून ऐकूं लागला. हा भसाडा आवाज डिस्पेन्सरींतल्या पांडोबाचा, किनरा आगगाडीच्या शिटीप्रमाणें कानांत शिरणारा आवाज त्या शेफरबाईचा, आणि कानांऐवजीं हृदयांत शिरणारा फुलपांखरासारखा हा आवाज एस्थरचा! एस्थरचा, कीं त्या नव्या कुरळ्या केसांच्या सुवर्णाचा? रतन तर्क करूं लागला. बाजाच्या पेटीच्या पट्ट्यांप्रमाणें शुभ्र गणवेषांतल्या नर्सेस

त्याला एकसारख्या वाटत. त्यामुळें पट्टी वाजवून रे ग म ध नी ओळखावी त्याप्रमाणें आवाज ऐकून कोणती एस्थर, कोणती सुवर्णा, कोणती शेवंती, याचा अंदाज करण्याची पाळी रतनवर आली होती. एकीकडे हा अंदाज बांधतांना दुसरीकडे रतन आपल्या मस्तकावरचा ' दिलीपकुमार ' फॅशनचा केशसंभार चाचपीत होता. कुस्तीचा विचार मनांत येतांच पहिलवानानं जितक्या सहजपणें दंड थोपटावे, पराक्रमाच्या विचारानं शूरानं मिशांना पीळ भरावा त्याप्रमाणें, तितक्याच सहजतेनं तरुणींच्या विचारानं प्रेमवीरांचे हात चटकन् डोकीवरचे केस चाचपूं लागतात. रतन आरशांतल्या आपल्या प्रतिबिंबावर खूष होता. त्याच्या मनांत आलं, मी सिनेमांतल्या डॉक्टरसारखा दिसतों कीं डॉक्टर असून सिनेमानट दिसतों ?...

पण तो पुन्हां वॉर्डमधून ऐकूं येणारं प्रार्थनागीत लक्षपूर्वक ऐकूं लागला व मनाशीं तर्क करूं लागला, हा आवाज मार्तंडचा, हा शेफरचा, आणि हा लता मंगेशकरहून गोड वाटणारा एस्थरचा ! त्यानं अधीरपणें घड्याळाकडे नजर टाकली, आणि जनरल वॉर्डमधून प्रार्थना संपवून सारीं आपापल्या ड्यूटीवर हजर होण्यासाठीं निघालीं तेव्हां तोहि घाईघाईनं निघाला. जिकडे-तिकडे कुजबूज झाली, " डॉक्टर राउंडला आले. " सर्वांच्या नजरा चुक-वून रतन एस्थरला संध्याकाळच्या सुटीबद्दल विचारणार होता. " संध्याकाळीं पांच वाजतां शेफरबाईकडून पी. एम. घेऊन आपल्याबरोबर सिनेमाला येण्याचा आग्रह तो तिला करणार होता...

चित्रपट सुरू होण्यास थोडा अवकाश होता म्हणून रतन एस्थरला घेऊन थिएटरच्या लॉबींत बसला आणि त्यानं थंड पेय मागविलं. एस्थरची व त्याची ओळख मोठया गंमतीदार प्रसंगीं झाली होती. हॉस्पिटलांतले मुख्य डॉक्टर गॉर्डन व सौ. गॉर्डन यांनीं आपल्या विवाहाच्या रौप्यमहोत्सवा-निमित्त मेजवानी दिली, तेव्हां एस्थरचं व त्याचं पान एकमेकाशेजारींच मांडलं गेलं होतं. ओळखीला मुहूर्त तरी चांगला झाला होता. गॉर्डन पतिपत्नींचा संसारपट पंचवीस वर्षे चालला, किंवा रौप्यमहोत्सवच काय, पण सुवर्णमहोत्सव गांठणाऱ्या चित्रपटाप्रमाणें तो चालविला गेला, कांहीं का असेना, एस्थरची व त्याची ओळख त्या दिवशीं झाली ती हळूहळू वाढत गेली होती...तिला वाचनाची आवड असावी. एक तर तिच्या डोळ्यांवर

नेहमीं चष्मा असे. आणि जेव्हां जेव्हां त्यानं तिला पाहिली होती तेव्हां तेव्हां कोणत्या ना कोणत्या वर्तमानपत्रांत डोकं खुपसून बसलेली त्याला ती आढळली होती. वर्तमानपत्रं वाचणारांना राजकारणाची आवड असते असा त्याचा अंदाज होता. एस्थर बहुधा समाजवादी असावी असा अडाखा त्यानं बांधला होता, व तिच्याशीं संभाषण करणं सोपं जावं म्हणून त्यानं प्रचलित राजकारणांतल्या पक्षांची उजळणीही केली होती. परंतु एकीकडे थंड पेयाची गोडी चाखतांना बॅग उघडून तिनं ' लोकसत्ते 'चा अंक काढला व वाचायला सुरवात केली, तेव्हां रतन नाखूष झाला, आणि म्हणाला,

" एस्थर, ही काय वर्तमानपत्र वाचायची वेळ अन् जागा आहे होय ? "

" मी वर्तमानपत्र वाचत नाहींच आहे. " एस्थर वर न पाहतां म्हणाली.

" मग काय करतेस ? " रतननं विचारलं.

" कोडं सोडवतें आहे. " तिनं उत्तर दिलं. ती उत्तर देऊनच थांबली नाहीं. तिनं टेबलावर लोकसत्तेचं शब्दकोड्याचं, चार ठसठशीत चौकोन असलेलं पान पसरलं, आणि पेन्सिलीचं टोक दातांवर आपटून ताल धरीत ती कोडं सोडविण्यांत मग्न झाली.

रतनला लाजेनं मेल्याहून मेलं झालं. कां कुणास ठाऊक, पण कोडीं सोडविणं ही उच्च संस्कृतीला लाजिरवाणी गोष्ट आहे अशी त्याची समजूत होती. आणि ही लाजिरवाणी गोष्ट एस्थरनं थिएटरच्या लॉबींत, आजूबाजूच्या प्रतिष्ठित स्त्रीपुरुषांदेखत निःसंकोचपणें करावी याचा त्याला धक्का बसला. चित्रपट सुरू झाला तेव्हां त्यानं सुटकेचा निःश्वास टाकला.

परंतु चित्रपट पाहण्यांत रतनचं मन रमेना. दोघांनीं मिळून चित्रपट पहायचा, एकमेकाच्या कानांत गुजगोष्टी करायच्या, हातांत हात धरायचा अशीं अनेक स्वप्नं त्यानं रंगविलीं होतीं. परंतु या त्याच्या स्वप्नांचे एस्थरनं लोकसत्तेच्या कोड्याप्रमाणें ' जास्तींत जास्त चौकोन ' उडविले होते. पडद्यावर राज कपूर नायकाच्या भूमिकेंत प्रेमाची " बरसात " उडवीत होता, तर रतन एस्थर-शेजारीं बसून कोरडाच राहिला होता. मध्यंतर होईपर्यंत एस्थर त्याच्याशीं अक्षरही बोलली नव्हती. चित्रपटही पहात नव्हती. मात्र " मध्यंतर "

हीं अक्षरं पडद्यावर उमटलीं तेव्हां तिनं आनंदानं टाळी वाजविली आणि ती रतनला म्हणाली,

" सांपडला. "

" काय ? " रतननं विचारलं.

" चार अक्षरी शब्द. केव्हांपासून डोकं खाजवीत होतें मी. मन्वंतर जमेना. मतांतर जमेना. पण आतां अचानक पडद्यावर " मध्यंतर " शब्द दिसला. मध्यंतर हा शब्द कोड्यांत कसा फिट बसतो. तुमच्याबरोबर सिनेमाला आलें त्याचा एक फायदा झाला. कोडं सुटलं ! "

आणि मग तिनं मांडीवर पुन्हां तें लोकसत्तेचं पान पसरलं, व आजूबाजूच्या लोकांची किंवा शेजारीं कपाळावर आठ्या घालून बसलेल्या रतनची तमा न करतां चौकोनांत अक्षरं लिहिलीं, " मध्यंतर. "

मध्यंतर संपलं. चित्रपट सुरू झाला. परंतु रतनचं लक्ष तिकडे लागेना. त्याच्या मनांत आलं, आपल्या दोघांमधें निर्माण होणारं अंतर संपण्याची आशा दिसत नाहीं.

नंतरच्या दिवसांत त्याची ही भीति खरी ठरली. तिच्या प्रियाराधनासाठीं हवा तितका वेळ व पैसा खर्च करण्याची त्याची तयारी होती. परंतु एस्थरच्या छांदिष्टपणामुळें त्याच्या साऱ्या उत्साहावर विरजण पडे. अन्नधान्य परिस्थिति, अंदाजपत्रक, अडतीस अक्षांश रेषेची भानगड, ॲंटिहिस्टॅमिनेट्स वगैरेपैकीं कोणत्याही विषयावर त्याचं आणि तिचं संभाषण होऊं शकलं असतं. त्या कसोटीला तो उतरला असता. परंतु शब्दकोड्यांचा त्याला इतका तिटकारा होता कीं एस्थरवर प्रेम करणं त्याला अवघड वाटूं लागलं. प्रथम प्रथम त्यानं तिला सर्व मदत केली. हॉटेलांत मजेखातर जेवतांना, फिरायला जातांना, किंवा एकांतांत केव्हां एस्थरचा सहवास घडला कीं एरवीं मूकस्तंभासारखी बसणारी एस्थर एकदम बोलकी होई. ' कल कीं खल ? ' ' जाया कीं प्रिया ? ' ' श्री कीं स्त्री ' ' आस्तिक कीं नास्तिक ? ' अशा उभ्या आडव्या शब्दांचा काथ्याकूट करण्यांत तिला भारी मौज वाटे. पैशासाठीं कोडीं सोडविणं म्हणजे रेस खेळणं, आंकड्याचे जुगार लावणं यांसारखाच अश्लाघ्य प्रयत्न होय असं मनांतून त्याला वाटे. परंतु कोडीं सोडविण्यामुळें भाषाशास्त्र, स्त्रीपुरुषांच्या मनोव्यापाराचं ज्ञान म्हणजे

मानसशास्त्र, वगैरे शास्त्रांचा अभ्यास घडतो, करमणुकीबरोबर बौद्धिक व्यायाम देणारें, अडाण्यांना सुसंस्कृत बनविणारें व परमार्थाबरोबर अर्थ साधणारें एक साधन म्हणजे शब्दकोडीं असं एस्थरला वाटे. ती म्हणे, " एका कोळियानें एकदां आपुलें " ही कविता उभा महाराष्ट्र पिढ्यान् पिढ्या पाठ करीत आला असेल. परंतु " फिरून यत्न करून " पाहण्याचा धडा त्याला कोणीं शिकविला असेल तर तो शब्दकोड्यांनीं.

एस्थरनं आजवर कोडीं सोडवून हजारोंनीं चौकोन पाठविले होते. पहिलं बक्षीस तिला कधीं मिळालं नव्हतं. एक चूकवाल्या, दोन चूकवाल्यां-मधेंही तिचं नांव कधीं आलं नव्हतं. परंतु " मीं हा शब्द कां निवडला ? " अशा तऱ्हेच्या पत्रव्यवहारांत तिला पांच पंचवीस रुपये मिळाले होते. जास्तींत जास्त चौकोन पाठवून मोठं बक्षीस मिळविण्याचीही तिची महत्त्वाकांक्षा होती. तिच्या या सर्व उद्योगांत रतननं सहकार्य केलं. एवढंच काय, कधीं दोनशेंसोळा तर कधीं आठशेंदहा चौकोन रात्र रात्र जागून भरण्याची हमाली त्यानं केली. फक्त एका आशेवर. त्याची सारी भिस्त मोरारजीभाईवर होती. दारूबंदी करून मोरारजींनीं लाखो बायाबापड्यांचा संसार उभा केला, त्याप्रमाणें वृत्तपत्रांवर कोडेंबंदीचा निर्बंध घालून आपल्या संसाराची निदान सुरवात करून दिली तर प्रेमाच्या या " चौकोनी " ( गुलाबी नव्हे ! ) कोड्यांतून सुटून " रेडिओ "ऐवजीं एस्थरसारखी पत्नी मिळेल ही आशा त्याला होती. मोरारजी कोडेंबंदी करणार अशा बातम्या वृत्तपत्रांतून तो वाचूं लागला, तशी त्याची ही आशा बळावत चालली. परंतु दारूबाजांपेक्षां ' कोडग्या ' वृत्तपत्रकारांमध्यें एकी असल्यामुळें त्यांनीं मोरारजींचा कोडेंबंदीचा उपक्रम हाणून पाडला. ज्या दिवशीं शब्दकोड्यांवर बंदी न घालण्याचा निर्णय मोरारजींनीं जाहीर केला, त्याच दिवशीं एस्थरचा संबंध तोडण्याचा निर्णय रतननं घेतला.

हा निर्णय घेतांना मोरारजींइतकाच रतनलाही मनस्ताप झाला. फरक एवढाच कीं मोरारजींनीं वैतागानं मंत्रिपदाचा राजिनामा दिला नव्हता. परंतु रतननं मात्र प्रेमाच्या भानगडींत पुन्हां पडायचं नाहीं असं ठरविलं.

अर्थात् रतनचा हा ‘ प्रेमसंन्यास ’ कांहीं गडकऱ्यांचा नव्हता कीं तो वर्ष न् वर्ष चालू रहावा. तो एकाच खेळानंतर बंद पडला. कोंबड्यानं आरवायचं नाहीं, सूर्यानं उगवायचं नाहीं, आणि तरुणांनीं प्रेमांत पडायचं नाहीं असं कितीही ठरविलं तरी निसर्गानं तें चालू दिलं पाहिजे ना ? एके दिवशीं नर्स चन्नम्मा रतनकडे आपल्या काळ्याभोर डोळ्यांनीं निरखून पहात म्हणाली,

“ डॉक्टर, निऊ भाळ खराब आगिदरी. ” ( डॉक्टर, तुम्ही फार रोडके दिसतां. )

“ भट्ट भाळ आगिद्यानू अनन कडमी उणत्यानू. ” ( लठ्ठ फार होऊं लागलों, म्हणून कमी जेवतों. ) रतननं उत्तर दिलं. या उत्तरानं आपण कोणतं संकट आपल्यावर ओढवून घेणार आहों याची रतनला कल्पना नव्हती. ती मलबारी सुंदरी म्हणाली,

“ हींग हौंद्री ? येन येन तिन्नोदू हेळतेनी मत्र. ” ( असं काय ? मग कोणकोणते पदार्थ खायचे तें मी सांगतें. मात्र मी सांगेन तें ऐकलं पाहिजे.)

रतन ‘ हूं ’ म्हणाला. एस्थरच्या प्रेमप्रकरणानंतर तो मनानं कांहींसा हळवा झाला होता. सहानुभूतीच्या साध्या शब्दानं त्याला गहिंवरून येई. मग “ डॉक्टर, तुम्ही रोडके दिसतां ” हे चन्नम्माच्या तोंडचे शब्द ऐकतांच तो विरघळला तर नवल कोणतं ? विशेष म्हणजे तिनं त्याच्या खाण्यापिण्याची चौकशी केली होती. कदाचित् स्त्रीस्वभावाला अनुसरून त्याच्यासाठीं कांहीं खमंग टमंग बनविण्याचा तिचा बेत असावा...

दुसरे दिवशीं मेसमधील मार्तंडऐवजीं चन्नम्मा त्याचं जेवण ट्रेमधून घेऊन आली, तेव्हां त्याला धक्काच बसला. तो म्हणाला,

“ हें काय ? तुम्हीं आणलंत माझं जेवण ? ”

“ त्यांत काय बिघडलं ? ” चन्नम्मा टेबलावर थाळी ठेवून म्हणाली, “ आजपासून तुम्ही माझे पेशंट ना ? ”

“ पेशंट ? ” रतननं आश्चर्यानं विचारलं. “ मला काय झालं आहे ? चांगला गलेलठ्ठ आहें कीं मी ! ”

" म्हणूनच. काल नाहीं का तुम्ही म्हणालां कीं मी लठ्ठपणा कमी करण्यासाठीं कमी जेवतों म्हणून? तेव्हां म्हटलं तुम्हांला सरळ ' डायेट 'वर ठेवावं. डायटेशिअन आहें मी. खास दोन महिन्यांचा कोर्स घेतला होता. आतां मी रोज तुमचा जेवणाचा मेनू तयार करून देईन."

" पाहूं या तरी काय आणलंत? मेसमधलं जेवून कंटाळलों आहे. चिकन बिरयानी..."

चन्नम्मा मोठ्यानं हंसून म्हणाली, " या तरी. जेवून पहा. मिसेस गॉर्डनला या डायेटवर दोन महिने ठेवली होती मीं. पावणेदोनशें पौंडांवरून शंभरांवर वजन आलं तिचं...कांहीं नाहीं, फक्त कोंड्याची भाकरी, फुळकवणी—म्हणजे लोणी काढलेलं ताक, आणि पालेभाज्या...सोपं आहे डायेट..."

रतननं घाबरून आ वासला. पण मग समोर चन्नम्मा उभीं राहिलेली पाहतांच त्यानं मोठा धीर करून कोंडयाच्या भाकरीचा घास तोंडांत कोंबून तो आ बंद केला. कांहीं झालं तरी चन्नम्मा एक स्त्री होती... सुंदर स्त्री होती. सौंदर्याची अगदीं चंद्रकोर नसली तरी हॉस्पिटलांतल्या मल्याळी मुलींत " त्रावणकोर " खचित होती. तिनं आणलेलं जेवण नाकारण्याचा धीर रतनला करवेना. परंतु ' एकच प्याला ', ' एकच स्पर्श ' याप्रमाणें रतनचा हा ' एकच घांस ' घातक ठरला.

आहारनियंत्रणाच्या निमित्तानं तो चन्नम्माच्या आहारीं गेला. पंधरा दिवस उलटून गेले तरी रोज कोंडयाची भाकरी, पालेभाज्या व ताक या आहाराला तो तानाजीच्या शौर्यानं ' तोंड ' देत राहिला. चन्नम्मा म्हणे असा सोशिक पेशंट आपण पाहिला नव्हता. डायेटवर राहणाऱ्या पेशंटवर पहारा ठेवावा लागतो, म्हणून चन्नम्मा शक्य तों रतनबरोबर असे. दिवसाकांठीं अमूक ' कॅलरीज ' अन्न त्याच्या पोटांत जावं असा ती कटाक्ष ठेवी. मेसमधील मार्तंड आचाऱ्याला आणि रतनच्या मित्रमंडळींना तर तिनं बजावलं होतं कीं डॉक्टरना पुलाव, बिरयानी सारं वर्ज्य आहे. तुम्हांला त्यांना चहा द्यावासा वाटलाच तर तो देखील बिन दुधाचा द्या. सध्यांच्या महागाईच्या काळांत स्नेह्याचं हें सोयिस्कर पथ्य कोण मोडील?

चन्नम्मानं रतनची चारी बाजूंनीं अशी नाकेबंदी केली होती. ही नाकेबंदी मोडण्याचं रतनला धैर्य होत नव्हतं. भिडेभिडे पोट वाढण्याऐवजीं तें झपाझप कमी होत होतं. एकदां त्याच्याकडे पाहात चन्नम्मा म्हणाली,

" एकदां आरशांत पहा तरी किती देखणे दिसूं लागलांत तें. "

तिच्या त्या स्तुतीनं रतन हरभऱ्याच्या झाडावर चढला. पण मग लगेच त्या स्तुतीपायीं करावी लागणारी उपासमार आठवून तो म्हणाला,

" तुला माझ्याविषयीं कांहीं वाटत नाहीं. "

" हा बरा उलटा न्याय ! " चन्नम्मा म्हणाली.

" इतर बायका पहा, पुरुषांना अजीर्ण होईपर्यंत खाऊं घालतात. तूं तर माझी उपासमार आरंभली आहेस. "

" इतर स्त्रियांना लठ्ठ पुरुष खपतात. मला नाहीं. "

" मग काय जन्मभर डायेटवर ठेवणार तूं मला ? "

" माझ्यासाठीं तेवढंही नाहीं का तुम्ही करणार ? " चन्नम्मानं लाडिकपणें विचारलं. परंतु रतननं तिकडे पाहिलंही नाहीं. कोंड्याची भाकरी, ताक, पालेभाज्यांइतकंच प्रेमाबद्दलही त्याचं मन एकदम विटलं. त्याला वाटलं कुठें तरी लांब लांब जावं आणि सुंदरशा उपाहारगृहांत ' चिकन पुलाव 'वर ताव मारावा. त्यानं घड्याळांत पाहिलं तों साडेआठ वाजून गेले होते. अर्ध्या तासांत त्याला रात्रीच्या ड्यूटीवर जाणं भाग होतं.

वॉर्डमधील राऊंड आटोपून तो स्पेशल खोल्यांकडे वळला. या लांबच लांब चाळीवजा इमारतींत दोन चारच सीरिअस पेशंट होते. बाकीच्यांना " गुडनाइट " किंवा फार तर " काय, बरं आहे ना हो ? " एवढ्या प्रश्नावर तो भागवीत असे. परंतु आज तेवढाही प्रश्न विचारण्याइतकी शक्ति रतनच्या अंगीं उरली नव्हती. वीस नंबरचा टायफॉइडचा पेशंट एकाएकीं कोलॅप्स झाला, त्याला ' सलाइन ' चढवून रतन खोलीबाहेर पडला, तेव्हां त्याच्या अंगीं बिलकुल त्राण उरलं नव्हतं. पोटांत कावळे कोकावत होते. रूम नंबर एकवीसच्या दाराबाहेरच उभं राहून त्यानं कसं बसं म्हटलं, " यू ऑल राइट, मिस राणे ? "

" या—आंत या..."

मिस् राणेचाच आवाज. पण असं घोगऱ्या घाबऱ्या आवाजांत कां बोलावते आहे ही असं रतनला वाटलं. तिनं असं कधींच त्याला बोलावलं नव्हतं. तो गोंधळून तसाच बाहेर उभा राहिला. मिस् राणेचा तो घोगरा चढा आवाज पुन्हां ऐकूं येऊं लागला,

**" या, आंत या !**
**म्हणाला उघडा दरवाजा !**
**तुम्ही कोण ?**
**प्रश्न केला**
**बंद दरवाजानें — घेतल्या मिटून फळ्या.**
**माहीत नव्हतें बिचाऱ्याला**
**हाडामांसाचा च्छेद करून**
**आरपार जाणाऱ्या क्ष किरणांसारख्या**
**सावल्या भुतांपुढें**
**दुबळा लाकडी प्रतिकार !... "**

आतां मात्र रतनला खोलीबाहेर राहवेना. " या आंत या " ही मिस राणेची हांक ऐकून त्याला आश्चर्य वाटलं होतं. परंतु पुढची ही बडबड ऐकून त्याला वाटलं हें लक्षण कांहीं ठीक नाहीं. मिस राणे कांहीं त्याची पेशंट नव्हती. डॉक्टर गॉर्डनच्या खास ट्रीटमेंटखालीं ती या खोलींत रहायला आली, त्याला पंधरा दिवस होऊन गेले होते. तिच्या चार्टवर गॉर्डननीं नक्की निदान कांहींच लिहिलं नव्हतं. नर्व्हस ब्रेकडाऊन, न्यूरस्थेनिया, अशा मोघम नांवांखालीं तिला टॉनिकच्या गोळ्या व लिव्हर एक्स्ट्रॅक्टचीं इंजेक्शनं सुरू होतीं. " खूप खा आणि खूप निजा " अशी डॉक्टरांची तिला आज्ञा होती. कांहीं दिवस लिहिण्यावाचण्याचं साहित्य तिला न देण्याबद्दल तिच्या शुश्रुषेसाठीं तिच्याजवळ राहणाऱ्या तिच्या मावशीला त्यांनीं बजावलं होतं. तिला ऐषआरामांत कॉटवर पडलेली पाहून पुष्कळदां रतनच्या मनांत आलं होतं, हे श्रीमंत लोक चैनीमुळें आजारी पडतात कीं आजारीपणामुळें चैन करतात !

परंतु आतां खोलीबाहेर उभं राहून आंत चाललेली तिची बडबड कानीं पडतांच त्याला वाटलं हें लक्षण कांहीं ठीक नाहीं. वात झालेलं माणूस देखील असं बडबडणार नाहीं...

रतन दार लोटून आंत गेला. मिस राणे टेबलापाशीं बसलेली होती. तिचे मोठे डोळे कुठें तरी अंतराळांत स्थिर झाले होते. तोंड उघडं होतं. छाती वर खालीं होत होती. रतननं मावशीकडे पाहिलं. "नशीब आपलं" अशा अर्थानं मावशींनीं कपाळावर बोट ठेवलं.

"कम ऑन मिस राणे..." असं आर्जवानं बोलत रतननं तिच्या खांद्यावर थोपटल्यासारखं केलं. आणि मग त्याचं लक्ष तिच्या पुढच्या ताटाकडे गेलं. ताटांत खव्याच्या पोळ्या, बटाट्याची भाजी, आणि हापूस आंब्याच्या रसाळ पिवळ्या धमक फोडी होत्या. "कम ऑन. आधीं जेवून घ्या..." असं तो म्हणतो तोंच मावशी म्हणाल्या,

"मी केव्हांचं तिच्यापुढें ताट वाढून ठेवलं आहे. आतां तुम्ही तरी पहा सांगून. तास होऊन गेला सारखं बरळते आहे...वरचेवर येतात तिला असे झटके. मग जेवणखाण कांहीं सुचत नाहीं....वातांत माणूस बरळतं तशी बरळते..."

"किती अडाणी आहेस ग तूं मावशी ?" मिस राणे त्या म्हातारीकडे रागानं पहात म्हणाली. अन् मग रतनला उद्देशून म्हणाली, "डॉक्टर, ही मावशीच काय, पण आमच्या घरांतलीं सारीं माणसं इतकीं अरसिक आहेत कीं त्यांना नवकाव्य आणि वातांतलं बरळणं यांतला फरकच कळत नाहीं. आतां तुम्ही ऐका हं. बसा. ऐका तरी माझी कविता—

"या, आंत या !

म्हणाला उघडा दरवाजा–"

कसला उघडा दरवाजा ?" तिनं एकदम रतनला प्रश्न केला.

मठ्ठ विद्यार्थ्यानं गोंधळावं तसा तो प्रश्न ऐकून रतन गोंधळला. "दरवाजा ? दरवाजा घराचा..."

"नव्हे ! स्मृतींचा !" मिस राणे म्हणाली, "तुम्ही कोण ? म्हणाला बंद दरवाजा ! विस्मृतीचा. काय, आहे कीं नाहीं कल्पनेची भरारी ?" मिस राणेनं विचारलं.

" वा ! वा ! " रतन कौतुकानं म्हणाला. आपण डॉक्टर लोक, जें कळत नाहीं त्याबद्दल बोलूं नये, असं त्याचं मत असल्यामुळें व नर्व्हस ब्रेकडाऊन झालेल्या पेशंटची लहर संभाळण्याच्या डॉक्टरी पद्धतीमुळें रतन पुढें म्हणाला,

" फारच छान आहे नवकाव्य. पण आधीं तुम्ही जेवून घ्या. "

" तुम्हीही बसा ना माझ्याबरोबर...माझी आणखी एक कविता ऐकवीन तुम्हांला. "

जेवायला मिळत असेल तर नवकाव्यच काय पण फांशीची सजा देखील ऐकण्याची त्या क्षणीं रतनची तयारी होती.

पंधरावीस मिनिटांनीं तो एकवीस नंबरच्या खोलींतून बाहेर पडला, तेव्हां मिस राणेच्या कविता या कानानं ऐकून त्या कानानं सोडून दिल्या-मुळें त्याचं डोकं रिकामं झालं असलं तरी पोट भरलं होतं. रतन मोठ्या खुषींत होता. रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या त्याच्या मनांत येत होतं, खव्याच्या पोळ्या फार खुसखुशीत होत्या. आंबे फार गोड होते. आणि खरं बोलायचं तर मिस राणे त्याहूनही गोड. पण चंद्रावर डाग असायचेच त्याप्रमाणें या तरुण मुलींना कसलं ना कसलं वेड असतं म्हणायचं. एस्थरचीं शब्दकोडीं, चन्नम्माचं आहारशास्त्र, तसं या मिस राणेचं नवकाव्य. अशा नादिष्ट मुलींपायीं दोनदां ठेचा खाल्ल्या तेवढ्या बस्. तिसऱ्यांदा नको...

मिस राणेच्या प्रेमांत पडायचं नाहीं असा निश्चय रतननं केला असला तरी तिच्याकडच्चं ऑमलेट, कबाब, बटाटेवडे, धानसाक यांसारखे खमंगटमंग पदार्थ न खाण्याचा निश्चय कुठें केला होता ? प्रथम कांहीं दिवस चन्नम्मा-कडून येणारी क़ोंड्याची भाकरी चुकविण्यासाठीं, आणि नंतर चटक लागली म्हणून, मिस राणेकडे तो वरच्चेवर जेवूं लागला. मांसाच्या तुकड्याच्या आमिषानं सिंह देखील तारेवरून चालतो, आगीच्या वर्तुळांतून उडी मारतो. मग रतन तर ' बोलून चालून ' मानव. मिस राणेचं नवकाव्यवाचन तो ऐकूं लागला. " भौतिक जगाचीं आणि मनोविश्वाचीं अनंत नवीं स्वरूपं, नव्या जाणिवा, शब्दांपेक्षां भावनांच्या गूढरम्य अद्‌भुत छटा ज्यांत दिसतात

तें नवकाव्य..." अशा गप्पा तो ऐकूं लागला. मिस राणे त्याला आग्रह करूं लागली,

"डॉक्टर, तुम्ही करा ना कविता."

"कविता करूं? तें काय ऑपरेशन आहे होय? मी डॉक्टर आहे हें विसरतेस—" रतन उत्तर देई.

"मग डॉक्टर काय कवि नसतात?" मिस राणे म्हणे, "अलिकडे साहित्यांत डॉक्टर, वकील, एंजिनिअर, किराणा भुसार व्यापारी, मंत्री, पुढारी यांचीच गर्दी जास्त झाली आहे. कारण आतां जीवनासाठीं कला या तत्त्वाचं पारडं वर आहे. तें कांहीं नाहीं. तुमचा माझा लोभ आहेच. वृद्धि व्हावी असं वाटत असेल तर अगदीं छान कविता केली पाहिजे तुम्हीं..."

रतन कविताही करूं लागला! चांदण्यांनीं भरलेल्या आकाशाकडे पहातांना तो गुणगुणूं लागला,

" निळ्या मखमली पिनकुशनांतली
ओढून टांचणी एक
कोरूं लागला आपुले दात
चित्रगुप्त—नव्हे कारकून शिरगणतीचा..."

रात्रपाळी नसेल तेव्हां कविता करण्याच्या ध्यासानं तो जागरणं करूं लागला... रात्रीं थर्मासमधील चहा घोटून सिगरेटचं पाकीट संपवून तो कविता करण्यास बसे. बाहेर रातकिड्यांचे कर्कश आवाज सुरू झाले कीं त्याच्या कल्पनांचीं चक्रं फिरूं लागत.

" किरकिरती रातकिडे—
उद्गारला कोणी रांगडा कवि—
महाराष्ट्राचा—दऱ्याखोऱ्याचा.
ऐकून खवळलें पित्त अख्या कीटक–दुनियेचें.
खेचला न्यायासनापुढें आणि भरविल्या
सभा निषेधाच्या.

जमले सारे किडे.
कांहीं सरपटणारे
कांहीं घसरणारे
कांहीं बिळांच्या गुहांत सिंहाचें जिणें जगणारे
कांहीं भूमिगत वीर ४२ च्या क्रांतिकारकांना
लाजविणारे...
जमले सारे – सरपटत, घसरत, लोळत, लोंबत
कोणी पोरकिडे,
कोणी थोर किडे
कोणी चोर किडे ! होते त्यांत कांहीं रातकिडे–
ज्यांचे कर्कश आवाज गेले भेदून सप्तपाताळें ! "

ही नवकविता वाचून मिस राणे बेहोष होऊन गेली. " तुम्ही जातिवंत नवकवि आहां " असं ती म्हणूं लागली, तेव्हां रतन म्हणाला,

" तुम्हीं मला कवि बनविलंत. "

तें खरं होतं. कारण रतन मिस राणेच्या प्रेमांत सांपडला होता. मिस राणेचा नवकाव्याचा छंद त्याच्यासारख्या अपेंडिसायटिस कापणाऱ्या गद्य डॉक्टरला रुचण्यासारखा नव्हता. पण प्रेमाची जादूच अशी आहे, कीं ती गद्य माणसाला देखील नवकवि बनविते.

एस्थरवर, चन्नम्मावर त्याचं खरं प्रेम नव्हतं. खऱ्या प्रेमाची कसोटी ही कीं दृष्टीला आपल्या प्रियकराच्या किंवा प्रेयसीच्या अंगचे दोष दिसत नाहींत. आणि दिसले तरी ते गोड वाटतात. राणेच्या बाबतींत तो या कसोटीला उतरला होता. म्हणून एके दिवशीं डॉक्टर गॉर्डननीं तिच्या चार्टवर " डिस्चार्ज " असं लिहिलेलं त्याला दिसलं, तेव्हां त्याला मोठाच धक्का बसला. ती वेळ सकाळीं साडेअकराची होती. रतन राऊंड घेत होता. त्याच्याबरोबर नर्स असल्यामुळें कॉटवर आरामांत पडलेल्या मिस राणेशीं तो कांहीं बोलूं शकला नाहीं. फक्त स्टेथॉस्कोपचं बटन मिस राणेच्या छातीवर अलगद ठेवून तो हळूंच पुटपुटला,

" आज जाणार ? मला माझ्या नव्या कविता वाचून दाखवायच्या होत्या..."

" आणि मलाही तुम्हांला खूप सांगायचं होतं—" मिस राणे म्हणाली.

" काय ? "

आणि मग कांहींच न बोलतां मिस राणेनं स्टेथॉस्कोपचं तें बटन जरा सरकविल्यासारखं केलं आणि मिस्किलपणें विचारलं, " आलं ऐकूं ? "

रतन ऐकूं लागला. " टिक टॉक, टिक टॉक ! "

पण तो काय नुसता डॉक्टर थोडाच होता ?

तो नवकविही होता. स्टेथॉस्कोपच्या त्या चिमुकल्या बटनांतून...

" ऐकिली त्यानें युगायुगांच्या
प्रणयिनींची मूक भाषा... ! "

❀ समाप्त ❀